






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








अंक क्र. ३२९/एप्रिल ते जून २००९

मराठी वाङ्मयाचा इतिहास विसाव्या शतकाअखेरच्या टप्प्यावर आणून पोहोचवणारा

**मराठी वाङ्मयाचा इतिहास**

**खंड सातवा : १९५०–२००० भाग पहिला**

प्रस्तुत वाङ्मयेतिहासातील विषय

१) सांस्कृतिक पार्श्वभूमी २) बालवाङ्मय ३) प्रवासवर्णन
४) चरित्रवाङ्मय ५) स्त्रीवादी वाङ्मय ६) लोकवाङ्मय
७) विज्ञानवाङ्मय ८) आदिवासी वाङ्मय ९) जैन वाङ्मय
१०) ख्रिस्ती वाङ्मय ११) मुस्लिम वाङ्मय
१२) जनसाहित्य १३) संगीतविषयक वाङ्मय
१४) कोशवाङ्मय व सूचिवाङ्मय

मराठी वाङ्मयेतिहासाच्या सातव्या खंडाच्या पुढील भागांतून आणखी सुमारे पंचवीस विषयांचा ऐतिहासिक परामर्श घेण्यात येईल. काव्य, नाटक, कादंबरी, कथा, विनोदी वाङ्मय, वैचारिक वाङ्मय यांसारख्या विषयांबरोबरच लोकप्रिय साहित्य, भाषाविज्ञान, व्याकरण, चित्रपट व मराठी साहित्य, चित्र-शिल्पकलाविषयक साहित्य, मराठी प्रकाशनव्यवसाय यांसारखे विषयही त्यांत समाविष्ट आहेत.

मराठी साहित्यप्रेमी वाचक, अभ्यासक तसेच इतर जिज्ञासू व्यक्ती यांना मराठी साहित्याचा इतिहास अद्ययावत करणारा सातव्या खंडाचा हा पहिला भाग स्वागतार्ह व संग्राह्य वाटेल.

**महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे**

मराठी
वाङ्मयाचा
इतिहास

खंड सातवा
१९५० ते २०००
भाग पहिला



महाराष्ट्र
साहित्य
परिषद, पुणे

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

**खंड सातवा : १९५० ते २०००**

**भाग पहिला**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

☐ अंक क्र. ३२९ : एप्रिल ते जून २००९

---






**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

दूरभाष – ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**डॉ. माधवी वैद्य,** प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**मेघा ग्राफिक सर्व्हिसेस,**
स.नं. १४/२३/४, घर नं. १५९८,
मोती बेकरीमागे, धायरी, पुणे - ४११ ०४१

मुद्रणस्थळ
**जंगम ऑफसेट प्रा. लि.,** २५/१० नांदेड फाटा,
सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : जून, २००९

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*

संपादकीय

# साहित्याचे विभ्रम...

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

शब्द, चित्र, शिल्प, नृत्य, नाट्य, गायन हे साहित्याचेच विभ्रम आहेत. मानवी जीवनास त्यांची युगेन्युगे साथ आहे. त्यामुळेच मानवी जीवन सुसंस्कृत आणि संपन्न झाले आहे. या अर्थाने सहित येऊन जीवन श्रीमंत करते किंवा जीवन श्रीमंत करण्यास योग्य होते, ते साहित्य ! स्वनापासून पदबंधांपर्यंत आणि पुढे सार्थ वाक्यबंधांनी आविष्कृत होणारी वाणी- हा साहित्याचा प्रथमाविष्कार-माणसांना जोडणारा. अनामिक शक्तींना आवाहन करणारा, आविष्काराचा आदिबंध आहे. शब्दाच्या अंतरंगाचे आणि त्यापलिकडचेही आविष्कृत करणारी चित्रकला, शिल्पकला, नृत्यकला आणि गायनकला ह्या आदिबंधांशी समांतर साहचर्याने, एकरूप होण्यासाठी युगेन्युगे आपले विभ्रम दाखवीत आहेत. हेच युगायुगांचे ''दर्शन''शास्त्र आणि हाच युगायुगांचा मानवधर्म आहे. ह्याच्याशी निष्ठा राखून त्या अनामिक आनंदाचा प्रत्यय देणाऱ्या व्यक्ती अजातशत्रू होतात. प्रिय होतात. त्या गेल्या तरी त्यांनी दिलेला आनंद काळही हिरावून घेऊ शकत नाही. त्यांचे स्मरणही आनंददायी असते.

**रसिकांचा 'राम' गेला !**

जगात बोलणाऱ्यांची वानवा नाही. बोलणाऱ्याचे चणेही चढ्या भावाने विकले जातात. ते जात असतीलही. फड जिंकणारे, केवळ लोकरंजनार्थ बोलणारेही आहेत. परंतु व्यासंगी शब्दकळेचा वक्ता म्हणून मन आणि बुद्धी उजळविणारे वक्तृत्व फार थोड्यांच्या वाणीला लाभलेले असते. जिव्हाळ्याचा सूर छेडणारे 'ये हृदयीचे ते हृदयी' जोडणारे वक्तृत्व लाभलेले प्राचार्य राम शेवाळकर अनंतात विलीन झाले आहेत. कीर्तनकाराची परंपरा लाभलेले; साध्या, सोप्या आणि नादमय वाणीने अवघड विषय आनंददायी करणारे राम शेवाळकर भारतीय संस्कृतीचे भाष्यकार होते. साहित्य आणि संस्कृती यांचा सुरेख संगम त्यांच्या व्यक्तिमत्त्वात होता. अध्यापक-प्राचार्य-अनेक संस्थांचे अध्यक्ष आणि मार्गदर्शक म्हणून ते महाराष्ट्रभर आणि महाराष्ट्राबाहेरही वावरले; सन्मानित झाले. दहा कवितासंग्रह, जीवनातील पावित्र्याची प्रचीती देणारे अमृतसरी... तारकांचे गाणे... माणकांच्या वाती... उजेडाची झाडे... देवाचे दिवे... भावबंध... प्रसन्नतेची भूक इत्यादि व्यक्ती आणि विचारांचे १५ ते २० ललितग्रंथ चैतन्याची वाटचाल करणारे आहेत. अभिजात संस्कृत वाङ्मयाचे त्याचे अनुवाद-आधारितग्रंथ त्यांच्या पांडित्याची साक्ष देणारे आहेत. अभिज्ञान शाकुंतल, भासाची भारतनाट्ये, त्यावर आधारित 'अग्निमित्र', कालिदासाची यक्षसृष्टी इ. दहा-बारा ग्रंथ त्यांच्या नावावर आहेत. संपादनकलेचे दर्शन घडविणारा 'विनोबा सारस्वत' हा त्यांच्या जिव्हाळ्याचा अभ्यासाचा संपादन-ग्रंथ आणि त्याबरोबरच लोकमान्य टिळकांचे निबंध, निरूपण चंद्रिका इ. १०-१२ संपादित ग्रंथ. त्यांच्या वक्तृत्वाचा पुनः प्रत्यय देणाऱ्या १७-१८ ध्वनीफितींमधून- महाभारतातील स्त्रीशक्ती, स्वातंत्र्यवीर सावरकर, रामायणातील राजकारण, ज्ञानेश्वरांचा चिद्विलास, ज्ञानेश्वराचा प्रतिभाविलास, योगेश्वर कृष्ण, कानडा तो विठ्ठलु इत्यादि विदग्ध साहित्यातील विचारधन प्राप्त होईल.

त्यांच्या ह्या उपकारातून उतराई होण्यासाठी समाजाने त्यांचे अनेक सन्मान केले. विदर्भ साहित्य नागरी सत्कार समिती, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज- नागपूर विद्यापीठ, अखिल भारतीय कीर्तनकुल, वृहनमहाराष्ट्र मंडळ, स्वामी रामानंद तीर्थ प्रतिष्ठान, इत्यादि संस्थांतर्फे हे सत्कार झाले. रसिकांच्या ह्या रामाचे साहित्य परिषदेतर्फे आदरपूर्वक स्मरण !

**अभ्यासू इतिहासनिष्ठ विदग्ध शैली - डॉ. अ. रा. कुलकर्णी**

इतिहासनिष्ठ शैलीने मराठ्यांच्या इतिहासाचे सुबोध दर्शन घडविणारे डॉ. अनंत रामचंद्र तथा अ. रा. कुलकर्णी

वयाच्या ८९ व्या वर्षी इतिहासलेखनाचा एक अनोखा विभ्रम मराठी साहित्याला देऊन गेले. ऐतिहासिक कादंबरी किंवा त्यापूर्वीचा इतिहासाचा लालित्यपूर्ण आविष्कार बखरी आणि ऐतिहासिक कादंबरी ह्या इतिहासाचे पुरावे मानले जात नाहीत. कल्पनेचे फुलोरे इतिहासाला मान्य नाही. परंतु इतिहासाशी इमान राखून लालित्यपूर्व शैलीत डॉ. अ. रा. कुलकर्णींनी आपले संशोधन सर्वसामान्य समाजाला समजेल असे आनंददायी केले, 'शिवशाही' हा त्यांच्या अभ्यासाचा आणि जिव्हाळ्याचा विषय. छत्रपती शिवाजी महाराज हे तत्कालीन मराठे सरदारांप्रमाणे राज्य उपभोगणारे लष्करशहा नव्हते; तर महाराष्ट्राच्या अस्मानी-सुल्तानीवर मात करून महाराष्ट्राचे आनंदवन करणारे 'जाणते राजे' होते. महाराष्ट्राच्या दुःखाने दुःखी झालेला, मावळसृष्टीतील साध्याभोळ्या शेतकरी, कातकरी, भिल्ल, रामोशांचे ते 'बळीराजा' होते. मोंगली, विजापुरी सत्तेला कुर्निसात करणाऱ्या मराठा सरदारांना स्वातंत्र्याच्या मोहिमेत सामावून घेणारा आणि खऱ्या अर्थाने 'मराठा तितुका मेळवावा' असे बेरजेचे राजकारण करणारा सुज्ञ राजा होता. छत्रपतींच्या जाणतेपणाचा मागोवा त्यांच्याच विविध पत्रांच्या आधारे घेऊन शिवाजीचे वेगळे 'जाणते रूप' त्यांनी आकारास आणले आहे. छत्रपती शिवरायानंतर काही काळ अस्थिर झालेल्या मराठेशाहीला स्थिर पायावर पुन्हा उभे करण्याचे श्रेय निष्ठावान् सेवक बाळाजी विश्वनाथ पेशवे यांच्याकडे कसे जाते. 'शनिवारवाडा' देशाच्या राजकारणाचा केंद्रबिंदू कसा झाला होता याचे 'पुण्याचे पेशवे' या ग्रंथात साधार सुबोध विवेचन केले आहे. त्यानंतर 'कंपनी-सरकार' ह्या त्यांच्या ग्रंथात इंग्रजांची भारतप्रवेशासाठी धडपड व्यापारी-संघटनेच्या मार्गाने कशी झाली आणि महाराष्ट्रात व हिंदुस्थानात इंग्रजी अमल १५० वर्षे का व कसा स्थिरावला. तराजू घेऊन आलेला कंपनीचा कारभार महाराष्ट्रातील भांडणामुळे राजकीय अमलात कसा परिवर्तित झाला याचे चित्रण या भागात आहे. हे सर्व इतिहासनिष्ठ ललित शैलीत आहे.

इतिहासाचे प्राध्यापक व भाष्यकार, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे चे कुलगुरू, देशातील आणि परदेशातील इतिहास-परिषदांचे अध्यक्षपद भूषविलेले डॉ. अ. रा. कुलकर्णी यांच्या इतिहासनिष्ठ ललित शैलीच्या साहित्याचा हा विभ्रम त्यांच्या निधनाने संपुष्टात आला.

**स्त्रीस्वातंत्र्याचा बंडखोर आविष्कार-कमला दास**

कमला दास यांच्या लिखाणात विवाह संस्थेच्या अपुरेपणाचा आणि रुक्ष बंधनाचा निषेध आहे. देहभूक आणि खरे प्रेम ह्या दोहोंना एके ठिकाणी शोधण्याच्या तिच्या अनोख्या बंडखोर वाटचालीला समाजाने मान्यता दिली नाही. नैतिक बंधनाच्या चौकटीत कामजीवनाची घुसमट होते म्हणून तिने धर्माचे बंधनही झुगारले. मुस्लिम धर्म स्वीकारला. देहवंधनाने आत्म्याचा, 'स्व'चा, शोध कधीच लागणार नाही. म्हणून तिची प्रतिभा मृत्यूची गीते गाऊ लागली. कारण मृत्यू देहबंधनातून 'स्व'ची सुटका करतो. हे तत्त्वज्ञान भारतीयांना, खरे तर नवे नाही. समाज, संस्कृती, धर्म, आचार या बंधनांना झुगारून नवी वाट शोधणाऱ्या डॉ. केतकरांच्या ब्राह्मणकन्येची आठवण झाल्याशिवाय रहात नाही. तीही अपयशीच होते. कमला दास यांच्या 'माय स्टोरी' ह्या आत्मचरित्रात त्यांच्या जगावेगळ्या जीवनप्रवासाचे कथन आहे. शेवटी मृत्यूच्या कविता आळविणारी ही मनस्वी लेखिका श्रेय आणि प्रेयाला एके ठिकाणी शोधण्याच्या अपयशी प्रवासातच मृत्यूच्या कुशीत विसावली. साहित्याच्या ह्या बंडखोर विभ्रमाला काय नाव द्यावे ?

कवि ना. घ. देशपांडे, बा. सी. मर्ढेकर, बा. भ. बोरकर, बालसाहित्यकार भा. रा. भागवत यांच्या जन्मशताब्दीनिमित्त स्मरणलेख पुढील अंकात असतील.

**जानपदाची शताब्दी**

२६ मे २००९ पासून, ग्रामीण तथा जानपद आविष्कारातून काव्य, कथा आणि कादंबरी यांचे दर्शन घडविणारे, मराठी साहित्यातील एक श्रेष्ठ नाव ग. ल. ठोकळ यांचे जन्मशताब्दी वर्ष सुरू होत आहे. 'सुगी' आणि 'मीठ भाकर'ची चव १९३० पासून तीच कायम आहे. यातील प्रत्येक कविता गेय आहे. चित्रमय शैलीची आहे. जानपद जीवनाचे ते 'रोमँटिक' रूपही आहे. त्यांच्या बहुतांशी कविता नगरमधील ग्रामीणजीवनाच्या पार्श्वभूमीवरील आहेत. वि. स. खांडेकरांची 'सुगी'ची प्रस्तावना बोलकी आहे. १९४० ते १९८० या कालखंडात प्रामुख्याने कथाकार म्हणून ते

लोकप्रिय झाले. मराठी नवकथेच्या प्रारंभाच्या कालखंडात 'ठोकळ-कथांनी' आपले जानपदत्व प्रस्थापित केले. सातारा, इंदूर-माळवा आणि नगरच्या परिसराला घेऊन अनुक्रमे ठिणगी, गावगुंड, टेंभा ह्या कादंबऱ्या लिहिल्या. 'टेंभा' ही आत्मचरित्रात्मक कादंबरी आहे. सर्व कादंबऱ्या ग्रामीण सामाजिक जनजीवनाच्या साक्षीदार आहेत.

मराठी साहित्यातील हा ग्रामजीवनाचा विभ्रम विसरता येत नाही.

**ह्या अंकात**

झाडी बोली आणि सिंधी भाषा यावरील लेख, अनुक्रमे डॉ. हरिश्चंद्र बोरकर आणिं प्रा. लछमण हर्दवाणी यांचे आहेत. कथेच्या स्थिती गतिविषयीचे भाष्य डॉ. मोनिका गजेंद्रगडकर आणि प्रा. आसाराम लोमटे यांचे आहे. प्रा. द. भि. कुलकर्णी यांनी कविता आणि गूढता यांचे नाते उकलून दाखविले आहे. ''भारतीय स्त्री साहित्याचा जागतिक मागोवा'' डॉ. उज्वला गोखलेंनी घेतला आहे. तसेच ग्रंथपरीक्षणे, 'निवडक नवे' ही सदरे आहेतच.

'विठ्ठला पायीची वीट' हा भक्ती सांप्रदायिक रहस्य उकलून दाखविणारा शीला निपुणगेंचा लेख वेगळी अनुभूती देणारा आहे. विविध विषयाला वाहिलेल्या ह्या अंकाचे वाचक स्वागत करतील; याची खात्री आहे.

कळावे;

सुप्रा कुलकर्णी

(संपादक)

दि. ०९ जून २००९ ७ गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग, अहमदनगर. संपर्क : ९७६७६९९३१९.
E-mail : suprakulkarni@gmail.com





अनुक्रमणिका



साली जानेवारीच्या एक तारखेला जांभळी/सडक येथे संपन्न झालेल्या सातव्या झाडीबोली साहित्य संमेलनप्रसंगाने प्रकाशित झालेल्या त्यांच्या या कवितासंग्रहात केवळ पारंपारिक कविता नाहीत; तर प्रारंभी तब्बल ११० चारोळ्या आहेत, त्यादेखील अस्सल झाडीबोलीत ! त्यानंतर पुन्हा झाडीबोलीतील नऊ कवितादेखील आहेत. या परिसरातील शेतकऱ्याच्या हृदयातील व्यथा सर्वप्रथम याच कवितासंग्रहाने मांडली आहे. नव्हे 'सपनधून' हे या कवितासंग्रहाचे शीर्षक त्याच व्यथेतून जन्मास आले आहे. कवी म्हणतात...

'मातीच्या सपनधुनीत, मातीना मानोस मरते
सपन पुरा करता करता, आकरी मातीतच मरते !'

मातीशी इमान राखणाऱ्या माणसाची हीच तर नियती आहे. तो आयुष्यभर मातीच्या सपनधुनीत जगतो आणि अखेरीस त्याच मातीत चिरविश्रांती घेतो. हेच त्याचे प्रारब्ध असते. म्हणूनच तो मातीचचे सपन पेरतो; आणि याच मातीत हिरेमोती पिकतील या आशेत डकरायला लागतो. आपल्या शेतकऱ्याने वाघासारखे डकरावे; आत्मघाताचा मार्ग पत्करू नये, असा सल्ला येथे आपोआपच दिला जातो.

या कवितासंग्रहाने निराशेतून बाहेर निघण्याकरिता जसा जगण्याचा मंत्र सांगितला आहे तसाच जीवन सुसह्य व्हावे म्हणून विनोदाचाही मार्गदेखील कथन केला आहे. वाणगीदाखल ही चारोळा पहा...

'हुड्डा भुजून झाल्यावर, बाजूले ठेवल्या पिस्या
लाहान नातवाना माज्या, गचकन् धरलन् मिस्या !'

ना. गो थुटे यांच्या झाडीबोलीतील या पहिल्याच कवितासंग्रहाने काव्यनिर्मितीचे अनेक स्वतंत्र मानदंड निर्माण केले आहेत एवढेच येथे नमूद केले पाहिजे. त्यांची वाट पुसत मग अनेकांनी हा आपला मार्ग म्हणून त्याच महाजनपथाची निवड केली.

काव्याच्या क्षेत्रात झाडीबोलीतील साहित्याचे भांडार विपुल आहे. अंजनाबाईची कविता - अंजनाबाई खुणे (२०००), राजन जयस्वाल - चऊक (२०००), हिरवा पदर - हिरामन लांजे (२००२), रूप झाडीचा - वा. चं. ठाकरे (२००२), कानात सांग - डॉ. हरिश्चंद्र बोरकर (२००२), माज्या मुलकाची कता - विठ्ठल लांजेवार (२००२), झाडीपट्टीचा बारसा - रामचंद्र डोंगरवार (२००३), झाडी भुलामाय - प्र. ग. तल्लारवार (२००४), आदवा - राजन जयस्वाल (२००४), अंजनाबाईची गाणी - अंजनाबाई खुणे (२००५), सोनुली - पांडुरंग भेलावे (२००६), माती मिरली मातीत - मुरलीधर खोटेले (२००७), माजी मायबोली - बापुराव टोंगे (२००८), झाडीची माती - मिलिंद रंगारी (२००८) ही सारी झाडीबोली साहित्य मंडळाची प्रकाशने आहेत. याशिवाय मोहतेल - प्रल्हाद मेश्राम, रंगल्या तांदराचा सडा - मनराज पटेल, घामाचा दाम - डोमा कापगते इत्यादी कवितासंग्रहांचादेखील उल्लेख करावा लागेल.

ही सारी नामावली नजरेसमोरून घातली तरी लक्षात येईल की; प्रत्येक कवितासंग्रहाने खास झाडीबोलीतील शीर्षक स्वीकारले आहे. आपल्या बोलीचे लक्षात यावे असे नाव आपल्या संग्रहास देण्याचा प्रत्येक कवीचा हा अट्टाहास, त्याच्या बोलीविषयक अभिमानातदेखील दृष्टिगोचर झाल्यावाचून राहत नाही. या प्रत्येक कवीने आपल्या कवितासंग्रहात झाडीबोलीची पाठराखण करीत तिची महती गाणारी एक तरी कविता रचल्याचे आढळून येते. किंबहुना अनेकांच्या कवितासंग्रहाच्या शीर्षकातही त्यांनी आपल्या झाडीबोलीला स्थान दिले आहे. प्र. ग. तल्लारवारांची 'झाडीभुलामाय' असो की- वा. चं. ठाकरे यांचा 'रूप झाडीचा' असो; रामचंद्र डोंगरवारांचा 'झाडीपट्टीचा बारसा' असो की मिलिंद रंगारी यांची 'झाडीची माती' असो... अशी ही झाडीमय काव्यरचना आहे. आपल्यावर प्रस्थापितांनी प्रदीर्घ काळापासून अन्याय केला, आपले शब्द कागदांवर येण्याची संधी देण्यासाठी प्रतिबंध केला, आपल्या शब्दांना हीन लेखले या पार्श्वभूमीवर त्यांनी प्रकट केलेली आपल्या झाडीबोलीची ही पाठराखण थेट मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर यांच्या उद्‌गारांची आठवण करून देणारी तर आहेच; शिवाय त्यांच्या या अभिव्यक्तीत प्रकट झालेला विद्रोह आजच्या दलित साहित्याशी नाते सांगणारा आहे.

यासंदर्भात डॉ. राजन जयस्वाल यांचा 'आदवा' न्याहाळला तरी पुरेसे आहे. विदर्भातील पहिला चारोळीकार म्हणून ख्याती असलेला हा कवी झाडीबोलीत आपले विचार प्रकट करताना थेट आधुनिक कवितेचे जनक म्हणविले जाणारे कृष्णाजी केशव

दामले, 'केशवसुत', आणि मराठी कवितेतील ज्ञानपीठ पुरस्काराचे मानकरी असलेले वि. वा. शिरवाडकर 'कुसुमाग्रज' याच्यावरदेखील हल्ला करायला मागेपुढे पाहत नाही. आपल्या 'माजी तुतारी' या कवितेत केशवषुतांच्या 'तुतारी' या सुप्रसिद्ध कवितेची चिरफाड करताना कवी म्हणून जातो.

'तुज्या तुतारीलं नसं आरू, त्यालं आता मी का करू? माज्या तुतारीची आरू सुव्वट, ते करंल सप्प्यायलं चोकट !'

प्रमाणमराठीतील तुतारी ही फुंकायची आहे; तर झाडीबोलीत तिचा अर्थ 'बैलांना टोचावयाची पराणी' असा होतो. या श्लेषाचा लाभ घेत या नाठाळांना वठणीवर आणण्याकरिता त्या फुंकावयाच्या तुतारीपेक्षा आपली टोचायची तुतारी अधिक लाभदायक आहे, असा विचार येथे कवी पटवून देत आहे !

याच काळात प्रकाशित झालेल्या अंजनाबाई खुणे यांच्या 'अंजनाबाईची कविता' या झाडीबोलीतील कवितासंग्रहाने नवीन बहिणाबाईचा उदय झाला. 'झाडीपट्टीची बहिणाबाई' हे डॉ. हरिश्चंद्र बोरकरांनी तिला दिलेली बिरूट सर्वत्र व सर्वतोमुखी झाले. बेळगाव येथे संपन्न झालेल्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाकरिता नवोदितांचे व्यासपीठ 'उगवतीचे रंग' स्थापन करून नवोदित कवींकडून कविता मागविण्यात आल्या होत्या. चौदाशे कवितांमधून जे चवदा कवी निवडले गेले, त्यांच्यात अख्ख्या विदर्भातून केवळ एक कवी, नव्हे कवयित्री निवडली गेली होती. आणि ती म्हणजे झाडीबोलीची अंजनाबाई खुणे. निरंजन उजगरे यांनी संपादित केलेल्या 'उगवतीचे रंग' या संग्रहात हे सर्व कवी एकत्रित आले असून त्या कविता वाचल्यास त्यांच्यामध्येदेखील अंजनाबाईचे वेगळेपण लक्षात आल्यावाचून राहत नाही. अंजनाबाईंच्या कवितेतील मरणासन्न आता आपले अखेरचे मनोगत व्यक्त करताना आपल्या सासरी असलेल्या लेकीस निरोप पाठविण्यासंबंधात कशी दक्षता घ्यायला सांगते ते पहा.

'माज्या मरनाची बातनी, सांगू नोको नंदीवर
भरली घागर बाई, माज्या मालनच्या डोईवर !'

अखेरची घटका मोजीत असलेली ही माय म्हणते की, नदीवर गेलेल्या माझ्या मुलीला माझ्या मरणाची बातमी कथन करू नका. कारण तिच्या डोक्यावर पाण्याने भरलेली मातीची घागर आहे. ही बातमी ऐकताच तिला घेरी येईल, खाली कोसळेल; आणि त्यामुळे तिच्या शिरावरली घागर खाली पडून फुटेल; आणि घरी गेल्यावर तिला हकनाक आपल्या सासूची बोलणी ऐकावी लागतील. मरणाला टेकलेल्या आईला आपल्या सासुरवाशीण लेकीची किती चिंता आहे पहा. कोणत्याही अलंकारादी सजावटीचा सोस न धरणारी अंजनाबाईची 'ही कविता अगदी आदिवासी तरुणीसारखी सुस्वरूप आणि निरलंकृत आहे. शिवाय तिच्यात वर्णनाचा साधेपणा व सच्चेपणादेखील ओतप्रोत आहे. येथे बहिणाबाईंशी अंजनाबाईचे वेगळेपण उद्धृत करण्याचा मोह होतो. बहिणाबाईंच्या ओळीओळींत उपमा-दृष्टांतांची रेलचेल आहे. तर अंजनाबाई मात्र अलंकारांना आपल्या जवळ फटकू देत नाहीत. त्यांना त्यांच्या सहकार्याची आवश्यकताच भासत नाही. इतके त्यांचे वर्णनसामर्थ्य अप्रतिम व असामान्य आहे.

यासंदर्भात 'कानात सांग' (डॉ. हरिश्चंद्र बोरकर) या कवितासंग्रहाचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. झाडीबोलीचे वेगवेगळे विभ्रम त्यांच्या या संग्रहात आढळून येतात. या संग्रहातील सर्वच कविता वेगवेगळ्या विषयांमुळे आणि विभिन्न प्रयोगांमुळे आपला वेगळा ठसा कायम ठेवून आहेत. झाडीपट्टीतील सर्वसामान्य व्यक्तीच्या भावभावना स्पष्टपणे व लीलया व्यक्त करणारी ही कविता आहे. त्यांनी रचलेल्या आणि गजानन बागडे यांनी गायलेल्या झाडीबोली गौरव गीताने सर्वच कार्यक्रमांना वेगळा बाज प्राप्त होत असतो. पण त्यांच्या कवितासंग्रहाच्या शीर्षकाची कविता विशेष लक्षणीय आहे. संक्रांत आली की झाडीपट्टीत सारा आसमंत विविध रंगांच्या फुलांनी बहरून जातो. पिवळा बाहावा, लाल सावरी, पांढरा कुडा, रंगीबेरंगी करकरी यांच्यासोबत पिवळा मोह व लाल पळस या रंगांची अक्षरशः उधळण असते. हे सारे असल्यावर वसंत आला हे सांगायला कोण्या ज्योतिष्याची गरज नसते की कोणत्या पंचांगाची आवश्यकता नसते. त्या क्षणी कवी गायला लागतात...

'झालीना भरला सोना, मोवाच्या झाडाखाली
कानात सांग परसाच्या, घात फुलाची आली ।'







वस्तुतः निसर्गनियम असा आहे की प्रथम पळस फुलारतो; आणि शिमग्याला त्याने सर्वांना रंगवून टाकल्यानंतर मग मोहाला बहर यायला लागतो. पण येथे विपरित घडले आहे. मोहाच्या खाली सोन्याचा सडा पडला आहे. अद्यापि त्याच्या शेजारी असलेला पळस मात्र फुलायलाच आहे. तेव्हा कवी म्हणतो, 'अरे, कुणी तरी या पळसाच्या कानात सांगा की फुलांचा हंगाम आला आहे. तुला आता फुलायलाच हवं !' आता लाजूनबुजून चालणार नाही; आलेल्या संधीचा लाभ घ्यायलाच हवा, असा संदेश देणाऱ्या या ओळी आपल्या अर्थगर्भतेमुळे आणि अनेक संदर्भाशी निगडित असल्यामुळे या परिसरातील वक्त्यांच्या मुखांत आणि नियतकालिकांच्या लेखांत वारंवार येताना दिसतात.

असाच वेगळेपणा जोपासणारी कविता हिरामन लांजे यांची आहे. मोर आणि गोच्या यांची तुलनात्मक प्रतिमा झाडीपट्टीतील कवीच नव्हे; तर सामान्य माणूसही बोलताना वापरत असतो. कोणतेही कर्तृत्व अंगी नसताना केवळ बडेजाव दाखवून आपले वर्चस्व स्पष्ट करणारे कितीतरी जण समाजात असतात. त्यांना उद्देशून मोर आणि गोच्या यांचा उपयोग करताना कवी म्हणतात...

'जवा सुटते वाराधुंद, अना अबार होते कारा
मोर नाचते बेधुंद, आपला फिरवून पिसारा
असा धुंदीत खुसीच्या, गोच्या नाचावाचा नाई
राज घटकाभऱ्याचा, त्याचा वाचावाचा नाई !'

रानातील एका सौंदर्यस्पर्धेकरिता मोर आपला साजशृंगार करीत बसला. आणि त्याच्या अनुपस्थितीत गोच्यालाच वेळेवर सौंदर्याचा राजमुकुट चढविण्यात आला. अर्थात् त्याचे हे सोंग किती काळ टिकणार आहे? आकाशात ढग जमले की, नाचायला एकाधिकार केवळ मोराचाच. ते गोच्याला कसे जमणार ? आणि मग त्याचे बिंग फुटल्याशिवाय कसे राहणार ? समाजातील ढोंगीपणाचे वाभाडे काढणारी कवी हिरामण लांजे, 'रमानंद' यांची ही कविता अगदी वेगळी अशी उतरली आहे.

'झाडीपट्टीचा बारसा' या कवितासंग्रहात रामचंद्र डोंगरवार यांनी समाजातील विषमतेवर पानोपानी प्रहार केलेले आढळून येतात. 'काहून रकत पेता ?' असा सवाल करीत ते ही विसंगती चितारतात...

'गरीब राबते रातदिन, अमीर करते त्याच्यावर चईन
तो खाते हरदिन तूपरोटी, राबनार राबते अर्ध्या पोटी !'

ज्याने कष्ट करावे त्याला पोटभर मिळू नये; आणि त्याच्या जीवावर मजा मारणारा अमीर मात्र तूपरोटी खात चैनीचे जीवन जगतो. याचा कवीला अतिशय राग येतो आणि तो मग आपल्या बोलीत अद्वातद्वा बोलायला लागतो. अस्सल झाडी बाज असलेली त्यांची ही सारी कविता आहे.

या उलट विठ्ठल लांजेवार यांची कविता गाताना दिसते. लयदार ओळींची नक्षी असलेली ही कविता गेयतेचा गळा धरून जशी पुढे जाते; तशी ती झाडीपट्टीची पाठराखणही करताना दिसते. ही झाडीबोली कशी आहे ते वर्णन करताना कवी गातात...

'झाडीपट्टीचा पाहुना, बोली रागोची बोलते
त्याले पाहून मनात, मैना पुन्याची झुरते !'

रागो व मैना यांची संगत झाडीपट्टीतील माउली पाळणागीतातही सांगत असते. पण येथे कवीने कहरच केला आहे. झाडीपट्टीतील रागोची बोली ऐकून थेट पुण्याची मैना झुरायला लागली आहे. झाडीबोलीने माधुर्याच्या संदर्भात पुण्याच्या बोलीवर कशी कुरघोडी केली आहे याचे योग्य शब्दात आविष्कारण या ठिकाणी कवीने केले आहे असे म्हणता येईल.

अशाच शब्दकळेचे देणे वरोरा येथील प्र. ग. तल्लारवार, 'प्रगत' यांना लाभले आहे. त्यांची कविता झाडीपट्टीचा चौफेर भूगोल वर्णन करण्यात जशी तरबेज आहे; तशीच येथील माणसाची भावभावना व्यक्त करण्यासही सक्षम आहे. शेतकऱ्याला दिलासा देताना 'मिरूग' या कवितेत कवी म्हणतात...

'नोको वैतागू गा असा, नवा तंतर घेऊन
हिमतीना कर काम, तुजा देव तू होऊन !'

तू घाम गाळला आहेस. त्याचे फळ कधी तरी मिळेलच. आज मिळाले नाही म्हणून असा निराश होऊ नकोस. तुझा देव तूच आहेस हे तू विसरू नकोस. असा सबुरीचा सल्ला येथे कवी देतात.

शेतकरी हा या सर्व कवितेचा प्रमुख विषय आहे. नव्हे; तोच झाडीकवितेचा नायक आहे. त्याचे मन ओळखायचे असेल, आणि जिंकायचे असेल तर त्याच्याशी त्याच्या शब्दात बोलायचा हवे. हा संदेश ही सारी कविता देत आहे.

झाडीबोलीची सारी वैशिष्ट्ये लेऊन नटलेली कविता म्हणून जिचा उल्लेख करावा लागेल अशी कविता पांडुरंग भेलावे यांच्या 'सोनुली' या कवितासंग्रहात आपल्याला सापडते. अनेक प्रकारच्या विषयांसह आपल्या वेगळ्या वर्णनशैलीने ती आपले लक्ष्य वेधून घेते. 'मन' या कवितेत बहिणाबाईसोबत संतांचा दाखला देत सर्वांनी मनाची केलेली भलावण कशी वरपांगी आहे हे साधार दाखवून देत कवी म्हणतात....

'मन मायेचा भोवरा, असा जोरात घुमते
राहूनई आपलाच, मती आपली भरमते !'

आपलीच मती भरमायला लावणारे हे मन कविता करायला लावते; हे मात्र सत्य आहे. या कवीच्या कवितेत असे मनाचे वेगवेगळे विभ्रम आढळतात.

शेतकऱ्याची व्यथा मांडणारी कविता येथे प्रत्येक कवी रचताना दिसतो. 'झाडीची माती' हा मिलिंद रंगारी यांचा कवितासंग्रह वाचला तर नावाप्रमाणे या संग्रहाच्या पानोपानी हा झाडीच्या मातीचा सुगंध पसरलेला दिसतो. येथे आपल्यावर झालेल्या अपमानासंबंधाचा संताप तर आहेच; पण अशाही परिस्थितीत शेतकऱ्याला समजावणीचा सूर कवीने लावलेला आहे.

'मुहून ऊठ तू जोराना, सोड मनावरचा भार
आत्महत्या नोको करू, तो गा बुहू अविचार !'

शेतकऱ्याने आत्महत्या करणे म्हणजे अविचार आहे हे त्याला त्याच्याच बोलीत येथे कवी समजावून सांगत आहेत. त्याचे हे सांगणे आपल्याच बोलीत असल्यामुळे शेतकऱ्याला ते शब्द खरोखर दिलाशाचे व भरवशाचे वाटतात.

मुरलीधर खोटेले यांचा 'माती मिरली मातीत' हा संपूर्ण शेतकरीजीवनावर बेतलेला कवितासंग्रह आहे. शेती व शेतकरी यांच्याशी संबंधित वेगवेगळ्या पैलूंवरील पंचवीस कविता आणि तेरा भागात विभागलेल्या १४८ ओव्यांचे 'मरणाही आधी राहिला मरोनी' हे खंडकाव्य. असा हा पसारा असलेले, अशाप्रकारचे, बोलीसाहित्यातील हे एकमेव उदाहरण असावे. त्यांनी शेतकऱ्याचे कष्ट आणि त्याच्या झोळीत पडणारी निराशा याचे यथातथ्य चित्रण यात केले आहे. उदाहरणादाखल एक ओवी पहा...

'चिता पेटली पेटली, धुंगा गेला गा अबारी
आत्मघाती असं किती, गेलं वऱ्या सेतकरी ?'

या प्रयत्नाला मधु मंगेश कर्णिक, भालचंद्र नेमाडे, डॉ. प्रतिमा इंगोले प्रभृतींचा लाभलेला पुरस्कार उचित आहे. शेतकऱ्याच्या जीवनावर त्याच्याच बोलीत त्याच्याच लेकराने चितारलेली शोकांतिका म्हणून मुरलीधर खोटेले या तरुण कवीच्या या कवितेचे मोल झाडीबोलीतच नव्हे तर मराठी साहित्यातही अनन्यसाधारण आहे.

या अनेक कवींच्या काव्यकर्तृत्वाचा धांडोळा घेण्याचा प्रयत्न 'कविता झाडीची' (संपा. डॉ. हरिश्चंद्र बोरकर व ना. गो. थुटे) या प्रातिनिधिक कवितासंग्रहात केला आहे. खरे म्हणजे हा केवळ तथाकथित प्रातिनिधिक कवितासंग्रह नाही; तर झाडीबोलीतील सर्वोत्कृष्ट कवितांचा संग्रह आहे. त्यादृष्टीने हा संपूर्ण संग्रह नजरेसमोरून घातला की झाडीपट्टीच्या काव्यविषयक जाणिवांची समृद्धी व श्रीमंती कळून येते. झाडीपट्टीतील ज्येष्ठ व श्रेष्ठ अशा पंचवीस कवींच्या अस्सल झाडीबोलीतील प्रत्येकी पाच कवितांचा हा संग्रह बोलीचळवळीचे यश अधोरेखित करणारा आहे एवढेच ह्या कवितासंग्रहासंदर्भात बोललेले पुरेसे ठरावे.

झाडीबोलीतील कथांच्या संदर्भात डॉ. घनश्याम डोंगरे (वास्तुक), डॉ. सुमिता कोंडबत्तुनवार (विश्वंभरा), मा. तु. खिरटकर (पोरका), दिवाकर मोरस्कर (गंप्याची बंडी), आणि वा. चं. ठाकरे (चटनीचा पेंड) ही नावे आघाडीवर आहे. डॉ. घनश्याम डोंगरे यांच्या 'वास्तुक' या कथासंग्रहाने नाशिकचा 'बंधू माधव पुरस्कार' प्राप्त करून झाडीबोलीला मानाचे पान मिळवून दिले आहे. त्यांच्या या संग्रहातील प्रत्येक कथेला झाडीपट्टीची पार्श्वभूमी प्राप्त झाली आहे. डॉ. डोंगरे यांच्या अकाली मृत्यूमुळे झाडीबोलीसाहित्य चळवळीची अपार हानी झाली आहे; हे येथे नमूद करावेसे वाटते.

दिवाकर मोरस्कर यांच्या 'गंप्याची बंडी' या संग्रहाचे वैशिष्ट्य म्हणजे येथे प्रत्येक कथेत लेखकाने अस्सल झाडीबोलीचा वापर केला आहे. सकाराम, सदूभाऊ व तारावैनी या तीन पात्रांच्या संवादातून पहिली कथा साकार होते. हीच पद्धती पुढल्या कथेतही कथाकाराने वापरली आहे. सभोवतालचे वातावरण जिवंत करण्याची किमया झाडीबोलीच्या वापरतून कथाकारास साध्य झाली आहे. त्यामुळे कथेत पाल्हाळिकपणा असला तरी प्रत्येक कथा





मनाचा ठाव घेताना दिसते.

'पोरका' हा कथासंग्रहात मा. तु. खिरटकर यांनी जैनाबाईचा गवरव, मावली, दसरू वस्ताद, आप्पा पाटलांचा पर्साद, पोरका, कहानी कमलाची, पस्तावा, संकरची सवक आणि सिकार या नऊ कथा समाविष्ट केल्या आहेत. प्रसंगावधान साधून गावातील लोकांना संकटमुक्त करणारी पहिल्या कथेतील जैनाबाई आणि आपल्यावर अत्याचार करू पहाणाऱ्या जंगलचपराशाची शिकार करणारी अखेरच्या कथेतील बायजा या दोन्ही अन्यायाच्या विरोधात पेटून उठणाऱ्या आहेत. हेच व्रत कथाकाराने इतरही कथांमध्ये अंगिकारले असल्याचे दिसून येते. ग्रामीण जीवनात पिळला जाणारा सर्वसाधारण माणूस समोर ठेवून चितारेल्या या सर्वच कथा मनाचा ठाव घेणाऱ्या आहेत..

डॉ. सुमीता कोंडबत्तुनवार यांचा 'विश्वंभरा' हा कथासंग्रह सर्वच दृष्टीने लक्षणीय असा आहे. पोंभुर्णा या अतिदुर्गम खेड्यात अध्यापनाचे काम करीत असताना आलेले अनुभव, एक महिला म्हणून चितारताना, महिलांवरील अत्याचारांना वाचा फोडण्याचे काम हा संग्रह करतो. 'चुक्की', 'पोली', 'खेलन', 'पारबता भुसारीन', 'लसनाचे आहाते' आणि 'पारूली' अशा केवळ सहा कथांचा हा छोटेखानी कथासंग्रह आहे. पण यातील साऱ्याच कथा विषयाच्या आणि आशक्षाच्या दृष्टीनेही महत्त्वाच्या आहेत. प्रत्येक कथेची नायिका एक स्त्री आहे हे या कथांची शीर्षके वाचली तरी लक्षात आल्यावाचून राहणार नाही. 'चुक्की' ही कथा नक्षलवादी चळवळीवर प्रकाश टाकणारी आहे. तर 'पोली' ही कथा शेतकरी जीवनात घट्ट पाय रोवून बसलेल्या अंधश्रद्धेवर बेतलेली आहे. 'खेलन' ही नक्षलवादी चळवळीकडे झुकलेल्या एका आदिवासी युवतीची मुलाखत आहे. तर 'पारबता भुसारीन' ही अत्याचाराचा बदला घेणारी ग्रामीण महिला आहे. 'लसनाचे आहाते' ही मन विषन्न करणारी शोकांतिका आहे; तर 'पारुली' ही नातवाने आपल्या आजीला त्रासदेणाऱ्या आईला शिकविलेला धडा आहे. प्रत्येक कथेत योग्य अशी वातावरणनिर्मिती करून स्वभावपरिपोष उत्कटपणे साधला गेला आहे.

झाडीबोलीतील कथाकारांचा प्रातिनिधिक कथासंग्रह झाडीबोली साहित्य मंडळाने प्रकाशित करून या परिसरातील सर्वच कथाकारांना एका व्यासपीठावर तर आणलेच आहे; शिवाय सर्वांच्याच कथा एकत्रित वाचण्याची सोय वाचकांना करून दिली आहे. डॉ. राजन जयस्वाल यांनी संपादित केलेल्या या कथासंग्रहात बकुबाईचा गाव (ना. गो. थुटे), रैनाकाकी (द. सा. बोरकर), आकरी वांजलंच रायलं (रामचंद्र डोंगरवार), सदू बिगाऱ्या (नाथ घरडे), च्यार काहाऱ्या (डॉ. हरिश्चंद्र बोरकर), पोरायसाटी तरी वाचवा (डॉ. घनश्याम डोंगरे), मालं न्याव द्या (विठ्ठल लांजेवार), सादनोक (हिरामन लांजे), मिया बिबी राजी तो... (शाम झाडे), बायकोचा लग्न (दिवाकर मोरस्कर), पस्तावा (मा. तु. खिरटकर), माजा नाव सुका (लखनसिंह कटरे), नवरा (राम महाजन), आणि पारुली (डॉ. सुमीता कोंडबत्तुनवार) या चौदा कथा वाचायला मिळतात. नव्हे झाडीपट्टीतील चौदा श्रेष्ठ कथाकारांचा परिचय येथे होतो. या कथाकारांनी झाडीबोलीत केलेले कार्य ज्यांना परिचित आहे; त्यांना त्यांचे हे कथाकथन त्या लेखकांची वेगळी ओळख करून देते. झाडीपट्टीतील वास्तवासोबत झाडीबोलीचे सामर्थ्य या कथांच्या शब्दाशब्दातून प्रत्ययास आल्यावाचून राहत नाही. हेच या कथासंग्रहाचे बलस्थान होय असे म्हणता येईल.

झाडीबोलीत काव्याचे व कथेचे क्षेत्र जसे विस्तृत आहे तसे कादंबरीचे मात्र नाही ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही. काही लेखकांकडे कादंबरी लिहून तयार आहे, पण प्रकाशकाअभावी तशीच पडून आहे अशी चारपाच तरी नावे सांगता येतील. यासंदर्भात अपवादात्मक नाव म्हणून डॉ. घनश्याम डोंगरे यांचा उल्लेख करता येईल. त्यांनी 'भाराटी' ही कादंबरी लिहून ती स्वतः प्रकाशित देखील केली. झाडीबोलीतील ही सर्वार्थाने पहिली व एकमेव अशी कादंबरी म्हणता येईल. अगदी कादंबरीच्या शीर्षकापासून प्रत्येक गोष्ट खास झाडीपद्धतीची असावी असा डॉ. घनश्याम डोंगरे यांचा आग्रह होता. या कादंबरीतील पात्रांपासून तर गावांच्या नावांपर्यंत सारे काही झाडीपट्टीतील आहे. अनेक घटनांची वर्णने वाचताना ही सारी आपल्या सभोवतीच घडत आहेत असा आभास वाचकाला व्हावा अशी प्रत्ययकारी वर्णनशैली डॉ. डोंगरे यांनी वापरली आहे. पात्रांच्या स्वभावपरिपोषासह झाडीबोलीतील संवादरचना आणि प्रसंगांची व्यवस्थित गुंफण यामुळे कादंबरी अनेक



अनुक्रमणिका

बाबतीत वैशिष्ट्यपूर्ण उतरली आहे.

याच संदर्भात इसादास भडके यांच्या 'बाप्तिस्मा ते धर्मांतर' या आत्मकथनाचा विशेषत्वाने उल्लेख करावा लागेल. लेखकाने वर्णन केलेला संपूर्ण परिसर झाडीपट्टीचा आहे. शिवाय आपली आई आणि सभोवतालच्या व्यक्ती यांची जी बोली या आत्मकथनात आली आहे; ती झाडीबोलीचा उत्तम व जिवंत नमुना आहे. त्यादृष्टीने हा ग्रंथ झाडीबोलीला ललामभूत ठरला आहे. या ग्रंथाला झाडीबोलीच्या उत्कृष्ट ग्रंथपुरस्कारासोबत वि. सा. संघाचा आणि महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट वाङ्मय पुरस्कार प्राप्त झाला आहे. शिवाय वेगवेगळ्या विद्यापीठांमध्ये या ग्रंथावर नऊ विद्यार्थी एम्.फील. करीत आहेत. ही या ग्रंथाच्या सर्वोत्तमतेची पावती म्हणता येईल.

'झाडीपट्टीची रंगभूमी' हा तसा उर्वरित महाराष्ट्रातील रसिकांकरिता उत्सुकतेचा विषय असतो. यासंदर्भात आता असे आत्मविश्वासाने सांगता येईल की रंगभूमीच्या अन्य बाबींसह नाट्यलेखनाच्या क्षेत्रातही ही रंगभूमी आत्मनिर्भर होत आहे. डॉ. हरिश्चंद्र बोरकर यांनी 'घायाळ वाघीण' या झाडीबोलीतील पहिल्याच नाटकात दंडार या झाडीपट्टीतील लोकप्रिय लोकनाट्याचा उपयोग करून नवीन पायंडा पाडला. त्यांनीच लिहिलेले 'सतीची सत्त्वपरीक्षा' हे संपूर्णपणे झाडीबोलीतील पहिले नाटक ठरले आहे. आघात (बा. ल. मेश्राम), रानपाखरे वेडी झाली (पांडुरंग भेलावे), श्रीमंतीची नशा करी जीवनाची अवदशा (प्रमोदकुमार राहांगडाले) ही नाटके झाडीबोली साहित्य मंडळाने प्रकाशित केली आहेत. आपल्या नाटकाच्या संहिता प्रकाशित व्हाव्यात अशी प्रवृत्ती नाटककारांची दिसत नाही. तशी नाटककारांची संख्या निश्चितपणे पंचेवीसाच्या वर असून नाटकांची संख्या दोनशेच्यावर आहे. सारीच नाटके तिकीटखिडकीवर यशस्वी ठरली असून धुमधडाक्याने त्यांचे प्रयोग सुरू आहेत.

या लेखात झाडीपट्टी व झाडीबोली यांच्याविषयीच्या महत्त्वाच्या ग्रंथांचादेखील उल्लेख आवश्यक आहे. यासंदर्भात डॉ. हरिश्चंद्र बोरकर यांच्या 'झाडीबोली : भाषा व अभ्यास' (१९९८) या ग्रंथाला वि. सा. संघाचा पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट ग्रंथपुरस्कार आणि भाषापरिषदेचा पुरस्कार लाभला आहे. तसेच त्यांचे 'झाडी मराठी शब्दकोश' (२०००) आणि 'झाडीपट्टीची लोकरंगभूमी' (२००४) हे दोन ग्रंथ म. रा. साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या प्रकाशन अनुदानाकरिता पात्र ठरले आहेत. त्याशिवाय त्यांची 'झाडीपट्टीची दंडार' (१९९९) आणि 'झाडीपट्टीची लोकगीते' (२००५) ही दोन पुस्तके एम. ए. मराठीकरिता लोकसाहित्याच्या अभ्यासक्रमास संदर्भग्रंथ म्हणून नागपूर विद्यापीठाने मान्य केली आहेत. हिरामन लांजे यांच्या 'महाराष्ट्राची लोकनृत्यनाट्यधारा' (२००१) या ग्रंथाला महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट ग्रंथपुरस्कार लाभला असून झाडीपट्टीचा संपूर्ण वेध घेणारा त्यांचा 'समग्र झाडीपट्टी' (२००५) हा ग्रंथ संदर्भ ग्रंथ म्हणून महत्त्वाचा ठरला आहे. झाडीबोली साहित्याचे महत्त्वाचे ग्रंथ म्हणून या सर्वांचा उल्लेख विशेषत्वाने करणे आवश्यक आहे.

आतापर्यंत निरीक्षण केलेले आपल्या सभोवतालचे दाहक वास्तव समर्थपणे चितारणे, त्याकरिता योग्य अशा झाडीबोलीतील शब्दांचा व प्रतिमांचा वापर करणे, ते व्यक्त करताना खोट्या सहानुभूतीची अपेक्षा न बाळगता स्वतःची वेगळी शैली निर्माण करणे, प्रतिपादनात तोच तोचपणा येणार नाही याची सतत सजग जाणीव ठेवणे, आपल्या प्रतिपादनाचा सार्थ स्वाभिमान पत्करणे आणि प्रस्थापितांच्या पायाशून्य शेरेबाजीला भीक न घालता स्वतःची वेगळी वाट तयार करणे ही सारी सव्यापसव्ये सांभाळून झाडीबोली साहित्याची ही विकट वाटचाल सुरू आहे; निरंतर सुरू राहणार आहे. इतकेच नव्हे तर तिला नवनवीन उन्मेष फुटणार आहेत.

झाडीबोलीतील साहित्याचा हा संक्षिप्त व धावता आढावा आहे. या साहित्याची नोंद समीक्षकांकडून हवी त्या प्रमाणात घेण्यात आलेली नाही; हीच खरी खंत आहे. वर्तमानपत्रात आलेली दोनतीन परीक्षणे आणि डॉ. घनश्याम डोंगरे यांचा 'राबता' (२००६) हा झाडीकवितासंग्रहांवरील समीक्षाग्रंथ वगळता अन्यत्र अद्यापि काही दखल घेतली गेली नाही. मान्यवर समीक्षकांकडून आपली समीक्षा व्हावी याची प्रतीक्षा हे सारे साहित्य करीत आहे. तो दिवस लवकरात लवकर उगवावा हीच अपेक्षा आहे.

❖❖❖

**डॉ. हरिश्चंद्र बोरकर**
रेंगेपार (कोहळी), पो. सडक पिंपळगाव, ता. लाखनी,
जि. भंडारा - ४४१८०४ मो. : ९४२२८९०९३७



अनुक्रमणिका

# सिंधी भाषा : स्वरूप आणि वैशिष्ट्ये

प्रा. लछमण परसराम हर्दवाणी

*[ सिंधी भाषा आज बोलीच्या रूपात जिवंत आहे. प्रा. लछमण हर्दवाणी ह्यांनी मराठीतील संतवाङ्मयाचे भाषांतर सिंधीत करून मराठी भाषेची मोलाची सेवा केली आहे. त्यांनी सिंधी भाषेच्या स्वरूप–वैशिष्ट्यांचा घेतलेला आढावा उद्‌बोधक आहे. –संपादक ]*

सिंध भारतीय उपखंडाच्या पश्चिमेचे टोक. सिंधू नदीच्या मुखाकडील हा भाग. सिंध ही सिंधूनदीची देणगी आहे. सिंधी लोकांच्या श्रद्धेचे आणि प्रेमाचे परमोच्च निधान सिंधू आहे. सिंधी लोकांजवळ विशाल दृष्टिकोन आणि धार्मिक सहिष्णुता आहे. विविधतेमागील एकतेवर त्यांची श्रद्धा आहे.

**सिंधी भाषा : स्वरूप**

सिंधी ही एक अभिजात, प्राचीन, स्वतंत्र आणि विपुल शब्द भांडार असलेली विलक्षण भाषा आहे. आपल्या इतर भाषा भगिनींप्रमाणे तिचे उगम स्थान संस्कृत असले; तरी ती त्यांच्यापेक्षा खूपच निराळी आहे. दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे सिंधी ही संस्कृत-प्राकृत परंपरेतील आर्य-भारतीय भाषा आहे. मराठी, हिंदी, पंजाबी, बंगाली या भाषांपेक्षा जुन्या प्राकृतशी, विशेषतः व्राचड अपभ्रंशाशी तिचे जवळचे नाते आहे. या भाषांची पूर्वरूपे, ध्वनी आणि व्याकरणिक वैशिष्ट्ये सिंधीने इतर कोणत्याही भारतीय भाषेपेक्षा अधिक जपली आहेत.

सिंधी भाषेचे गाढे अभ्यासू आणि विद्वान डॉ.अर्नेस्ट ट्रम्प हे १८७२ मध्ये लिहिलेल्या 'सिंधी अल्फाबेट अँड ग्रामर' या आपल्या संस्मरणीय ग्रंथात लिहितात :

"सिंधी ही शुद्ध संस्कृतोद्‌भव भाषा आहे. उत्तर भारतातील इतर प्रांतिक भाषांपेक्षा ती परकीय तत्त्वांपासून मुक्त आहे. जुन्या प्राकृत व्याकरणकारांनी, सध्याची सिंधी भाषा थेट अपभ्रंश भाषेपासून निघाली असून प्राकृत भाषांतील ती सर्वांत निकृष्ट दर्जाची भाषा आहे, असे विधान केले आहे. ते कदाचित सकारण असेल; पण सिंधी भाषेची आपण इतर भाषा-भगिनींशी जर तुलना केली तर व्याकरणदृष्ट्या तिला सर्वोच्च स्थान द्यावे लागेल. आजच्या मराठी, हिंदी, पंजाबी, बंगाली भाषेपेक्षा सिंधी ही जुन्या प्राकृत भाषेला अधिक जवळची आहे; आणि तिने व्याकरणरुपांचे वैपुल्य आणि विविधता अधिक प्रमाणात जतन केलेली आहे. इतकी की, त्यासाठी इतर भाषा-भगिनींना तिची असूया वाटावी; कारण भारतातील अर्वाचीन भाषा पूर्णपणे नष्ट होत आहेत. जुन्या मान्यवर मातृभाषेचे स्वरुप, तिच्या कन्यका ओळखू न येण्याइतके विकृत झाले आहे. उलट अशा वेळी सिंधी भाषेने मात्र सर्व महत्त्वाची वैशिष्ट्ये (रुपे)जतन करून ठेवलेली आहेत. तिने व्याकरणाची एक खास चौकट स्वतःसाठी उभारलेली आहे. अभिव्यक्तीतील सौंदर्य व आंतरिक सुसंगतीच्या बाबतीत ही चौकट इतर भाषांच्या विस्कळीत आणि सपाट रचनेला मागे टाकते."

आपल्या 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' भाग १ या ग्रंथात सर जॉर्ज ग्रियर्सनदेखील म्हणतात, "सिंधी ही एक फार प्राचीन भाषा आहे. ती प्राकृतच्या व्राचड या भेदापासून थेट निघालेली आहे." सिंधी भाषेचे अभ्यासक डॉ. नबीवक्ष बलोच म्हणतात, "सिंधी भाषेची पूर्व-पीठिका संस्कृत-प्राकृत आहे." काही सिंधी विद्वानांच्या मते सिंधी भाषा ही संस्कृतपासून निघालेली नसून उलट सिंधीतून संस्कृतचा जन्म झालेला आहे ! पण सिंधी व संस्कृत-प्राकृत यांचे अगदी जवळचे नाते आहे, यावद्दल मात्र कुणाचेही दुमत दिसत नाही.

**सिंधी भाषा : लिपी**

सिंधी भाषा ही दोन लिपींतून लिहिली जाते. एक अरबी/ अरेबिक लिपी व दुसरी देवनागरी लिपी. सिंधीची अरबी लिपी (उर्दुसारखी दिसणारी) ही ब्रिटिश सरकारच्या आदेशानुसार कृत्रिम रीतीने तयार करण्यात आलेली आहे. १८४३ मध्ये ब्रिटिशांनी सिंध प्रांत काबीज केला. तेव्हा तेथे कोणतीही एक लिपी वापरात नव्हती. ब्रिटिशपूर्व काळात न्यायालयीन भाषा फारसी होती. अरबी लिपीबरोबरच देवनागरी, गुरुमुखी आणि 'हटवाणकी' इ. लिप्याही प्रचलित होत्या. सिंधी भाषेतील पहिली व्याकरणाची पुस्तके व शब्दकोश मात्र देवनागरी लिपीत होते. याविषयी 'सिंधी व्याकरण' या आपल्या ग्रंथात कॅप्टन जॉन स्टॅक यांनी १८४९ मध्ये काही कारणे दिलेली आहेत. शेवटी ते म्हणतात की, सिंधीच्या मूळ स्वभावाशी देवनागरी लिपीच अधिक मिळती जुळती आहे. म्हणून कॅप्टन

स्टॅक यांनी 'इंग्लिश-सिंधी शब्दकोश' (१८४९) व 'सिंधी-इंग्लिश शब्दकोश' (१८५५) या आपल्या ग्रंथात देवनागरी लिपीचा वापर केला.

पुढे मात्र इंग्रजांच्या कृपाछत्राखाली तयार झालेली नवीन अरेबिक सिंधी लिपी ही सिंधी हिंदू जनतेवर लादण्यात आली. १८५३ मध्ये ईस्ट इंडिया कंपनीने सिंधी लिपी निश्चित करण्यासाठी एक समिती नेमली. या समितीने काही अरेबिक व काही फारसी लिपीतले वर्ण एकत्र करून तिसरी एक वेगळी लिपी तयार केली. तीच सध्याची अरबी सिंधी लिपी होय. या लिपीत ५२ वर्ण आहेत. आधुनिक सिंधी वाङ्मय प्रामुख्याने याच लिपीत लिहिले गेले आहे. जुन्या लेखकांवर याच लिपीचा पगडा आहे. मात्र सिंधी भाषेच्या आविष्कारासाठी ही लिपी तोकडी ठरते. सिंधी भाषेचे गाढे विद्वान व सिंधी भाषेचा इतिहास' लिहिणारे भेरूमल महरचंद आडवाणी हे आपल्या एका लेखात 'सिंधू' (१९३४) मासिकात लिहितात, "आत्ताची अरेबिक सिंधी वर्णमाला अरबी समुद्रात बुडवून, मोठ्या मनाने देवनागरी वर्णमाला उपयोगात आणायला पाहिजे."

अरेबिक लिपीबरोबर सिंधीचे देवनागरी रुपही प्रचलित आहे; आणि भारतात ते दिवसेंदिवस लोकप्रिय होत आहे. अनेक जुन्या व अभिजात ग्रंथांचे देवनागरीकरणाचे कामही सध्या जोरात सुरू आहे व त्यात यशही मिळत आहे. अरबी लिपीच्या कट्टर समर्थकांनाही आता वाटायला लागले आहे की, त्यांची पुस्तके देवनागरीतून देखील छापून यायला पाहिजेत. वास्तविक देवनागरी ही सिंधी संस्कृतीची लिपी आहे; आणि त्यातूनच भारतातील सिंधी लोकांच्या भावना व विचार इ. व्यक्त होणे सोयीचे आहे.

**सिंधी भाषेची ठळक वैशिष्ट्ये**

सिंधीचा शब्दसंग्रह निरनिराळ्या स्रोतातून आलेला आहे. सिंधीमधील जवळजवम ७० टक्के शब्द संस्कृत-प्राकृतमधून स्वीकारलेले आहेत. द्रविडी भाषेतील शब्दही सिंधीत सापडतात. नेहमीच्या संपर्कामुळे अरबी-फार्सी शब्दांनीही सिंधीत भर घातलेली आहे. कोणतीही भाषा ती बोलणाऱ्या लोकांच्या गरजा भागविण्यासाठी शब्द घडवीत असते. 'उंट' या शब्दासाठी सिंधीत पंधरा शब्द आहेत. कोणत्याही भारतीय भाषेत एवढे शब्द सापडणार नाहीत. शरीरावयव, विविध प्राणी व वनस्पती यांचे वर्णन करण्यासाठी सिंधीत विपुल शब्द आहेत. पिकांच्या परिभाषेबाबत ती विशेष समृद्ध आहे. गवत आणि मासळीविषयक शब्दांचीही तीच स्थिती आहे. कौटुंबिक नातेसंबंध व्यक्त करण्यासाठी इतर भाषांत एकाहून अधिक शब्द वापरावे लागतात. पण ते एकाच शब्दातून व्यक्त करण्यात सिंधी शब्दसंग्रहाचे वैशिष्ट्य आहे. आधुनिकयुगाच्या गरजा भागविण्याइतकी सिंधी समृद्ध भाषा नक्कीच आहे.

सिंधी भाषेचं मराठीशी अगदी जवळचं नातं आहे. किंबहुना व्याकरणाच्या दृष्टीने मराठीशी साधर्म्य साधणारी सिंधीच एकमेव भाषा आहे असे वाटते. उदा. 'ण'कारांत क्रियापदे मराठीप्रमाणे सिंधीतच सापडतात. (उदा. खाणे-खाणु, पिणे-पिअणु, उठणे-उथणु, करणे-करणु इ.) महत्त्वाचे म्हणजे 'आहे' हे क्रियापद फक्त मराठी आणि सिंधीतच वापरले जाते, जगातल्या कोणत्याही इतर आधुनिक भाषेत नाही ! (उदा. माझे नाव राम आहे = मुंहिंजो नांउ राम आहे.) त्याचप्रमाणे मराठी सर्वनामेही सिंधी सर्वनामांशी जवळीक साधणारी आहेत. उदा. हा, ही, हे: या मराठी सर्वनामांना सिंधी पर्याय असे आहेत- हीऊ, हीअ,





अनुक्रमणिका

हीउ. (उदा. हे पुस्तक आहे = हीउ पुस्तकु आहे; हा घोडा आहे = हीउ/ही घोड़ी आहे; ही नदी आहे = हीअ नदी आहे.) सिंधी मराठीमध्ये विलक्षण साम्य आहे. सिंधीतील किमान ५००० शब्द मराठीशी साधर्म्य दर्शविणारे आहेत.

**इतर काही ठळक वैशिष्ट्ये अशी-**

१) प्राकृतप्रमाणे सिंधीचे सगळे शब्द स्वरान्त असतात.

२) अकारान्त, इकारान्त व उकारान्त शब्दांच्या शेवटच्या अक्षरांचा उच्चार पूर्ण होतो. उदा. 'खट' (खाट) मध्ये 'ट'चा उच्चार पूर्ण केला जातो. 'सत' (सात), 'अठ' (आठ), 'रामु' (राम) इ. शब्द असेच आहेत.

३) अकारान्त नामे बहुधा स्त्रीलिंगी असतात. उदा. नथ (नथ), लहिर (लहर), जिभ (जीभ), लीक (रेषा), संदूक (पेटी), खट (खाट).

४) ओकारान्त नामे पुल्लिंगी असतात. उदा. घोड़ो (घोडा), कुतो (कुत्रा), काको (काका), मामो (मामा), महीनो (महिना) डाडो (आजोबा).

५) आकारान्त आणि ऱ्हस्व-दीर्घ इकारान्त नामे बहुधा स्त्रीलिंगी असतात. उदा. माया (माया), छाया (छाया), जोइ (जाया, बायको), माई (बाई).

६) ऱ्हस्व दीर्घ उकारान्त नामे बहुधा पुल्लिंगी असतात. उदा. ग्रंथु (ग्रंथ), घरु (घर), सिजु (सूर्य), रामु (राम), चंडु (चंद्र), रंगु (रंग), माण्हू (माणूस).

७) हिंदीप्रमाणे सिंधी भाषेत लिंगे दोनच आहेत- पुल्लिंग व स्त्रीलिंग.

८) सिंधीत वचनेही दोनच आहेत- एकवचन, बहुवचन.

९) 'ञ' आणि 'ङ' ह्या वर्णांचा वापर सिंधीत आजही विपुल प्रमाणात होतो. उदा. अञा (अजून), वञणु (जाणे), थञु (स्तन्य, आईचे दूध), जञ (वरात), वाङणु (वांगे), सिङु (शिंग), आङुरि (अंगुली, बोट), चङो (चांगला), भञणु (भंजणे), मुङ (मूग), विञिणो (विंझणा, पंखा), हिङु (हिंग).

१०) सिंधीमध्ये ग, ज, ड, ब यांचे नेहमीच्या ध्वनिव्यतिरिक्त निराळे ध्वनी आहेत. हे अंतःस्फोटक (Implosive) ध्वनी होत. ते त्या अक्षराखाली रेखा देऊन दर्शविले जातात- ग, ज, ड, ब. हे वर्ण फक्त सिंधी भाषेतच आहेत. जगातल्या दुसऱ्या कुठल्याही भाषेत सापडत नाहीत. ग, ज, ड, ब चा उच्चार करतेवेळी नेहमीप्रमाणे हवा बाहेर न सोडता आत घेतल्यास हे उच्चार सहजपणे होतात.

११) अकर्तृक क्रियापदे सिंधीशिवाय बहुधा दुसऱ्या कोणत्याही आधुनिक भारतीय भाषेत वा युरोपीय भाषेत नाहीत. उदा.

१. नदीअ में तरिजे थो = नदीत पोहलं जातं.

२. पींघे में लुडिबो आहे = झोपाळ्यात झोके खाल्ले जातात.

खरं तर अशा वाक्यांचं शब्दशः भाषांतर होऊ शकत नाही. हे रूप प्राचीन संस्कृतचं असून सिंधीत अजूनही कायम आहे.

१२) सर्वनामीय शेवट फक्त सिंधीत आणि काही प्रमाणात काश्मिरी भाषेत आहेत. काही वेळेला तर एकाच क्रियापदामध्ये दोन शेवट जोडून कर्ता किंवा कर्म यांचे अर्थ प्रकट केले जातात. असे शब्द जणू 'शार्ट हँड रायटिंग'चं कार्य साधणारे आहेत. हे सिंधीचे फार मोठे वैशिष्ट्य मानले पाहिजे. उदा.

१) मारायाईमि = त्याने मला दुसऱ्याकडून मारविले.

२) खारायाईमि = त्याने मला खाऊ घातले.

सरहद्दीवर असल्यामुळे सिंध नेहमीच आक्रमकांच्या पायांखाली तुडविला गेला आहे. आर्य, द्रविड, अतिप्राचीन आदिवासी, ग्रीक, अरब, इराणी, मोगल, पठाण व युरोपियन या सर्वांनी सिंधमधून प्रवास केलेला आहे. त्यांचा काही ना काही ठसा सिंधी संस्कृतीवर व सिंधी भाषेवर उमटलेला आहे. तरीही सिंधी भाषेने आपली प्राचीन रूपे जतन करून ठेवलेली आहेत. आजही ती एक जिवंत भाषा सिद्ध झालेली आहे.

❖❖❖

**प्रा. लछमण हर्दवाणी**
'कविता', प्राध्यापक वसाहत, सावेडी, अहमदनगर-४१४००३.
मो. : ९८९०६९३९३१





अनुक्रमणिका

# कविता आणि गूढता

डॉ. द. भि. कुलकर्णी

*[ मराठीतील गूढगहन काव्यार्थावर आजपर्यंत खूप चर्चा झाली आहे. 'द. भि.'च्या लेखाने त्यात मोलाची भर टाकली आहे. म.सा. पत्रिकेने प्रकाशित केलेल्या काव्य विशेषांकासाठी उशीराने आलेल्या ह्या लेखाचा या अंकात समावेश केला आहे. –संपादक ]*

आजपासून बाराव्या शतकापर्यंत मराठीत गूढवादी काव्य प्रचुर प्रमाणात आविर्भूत झाले आहे. दुर्दैव हे आहे की त्याकडे 'गूढवादी काव्य' म्हणून न पाहता आपण 'दुर्बोध काव्य' म्हणून पाहिले : दिलीप पुरुषोत्तम चित्रे, बाळ सीताराम मर्ढेकर, श्री ज्ञानेश्वर, श्री तुकाराम, हे मराठीचे श्रेष्ठ गूढवादी कवी आहेत, त्यांचा गूढवाद जाणवायला 'गूढवाद' या संज्ञेचा अर्थ, आपल्यापुरता तरी, सुस्पष्ट असला पाहिजे. गूढवादी कवितेचा ओढूनताणून अर्थ काढणारे अध्यापक अनेक आहेत; पण ती कविता गूढ का झाली आहे हे मात्र ते सांगू शकत नाहीत !

त्यासाठी गूढ या शब्दाच्या जवळपास येणाऱ्या शब्दांचा नेमका बोध होणे आवश्यक असते.

'कूट' हा असा एक शब्द आहे. कूट म्हणजे गूढ नव्हे; कूट म्हणजे कोडे. कोड्याला निश्चित उत्तर असते. जसे, उखाणा. उखाणा घालणाऱ्याला त्याचे उत्तर माहीत असते. जसे, "करतळीं जी जन्मली । सूर्यकरीं जी वाढली। पतीविण सती गेली । ऐसी नारी कोण ती ?" या उखाण्याचे उत्तर ज्याला माहीत नाही; त्याच्या दृष्टीने हा उखाणा हे एक कोडेच आहे; पण ज्याला 'गवरी' हे त्याचे उत्तर माहीत आहे त्याला त्यात कूट असे काहीच वाटणार नाही; गूढ तर नाहीच नाही. "इकडून गेली उगीमुगी । तिकडून आली पोटफुगी" (मोट), "आमचा उखाणा टिंयां टिंयां । पिकल्या फळाला बाहेर बिया" (जांबकाजू), "अलंगडीवर पलंगडी पलंगडीवर दाजीबा। बिब्बीने सलाम केला । दाजीबांचा प्राण गेला॥" (दिवा) असे शेकडो उखाणे माझ्या आईकडे होते. ते विचारून विचारून ती मला हैराण करीत असे. मग कधीतरी त्याचे उत्तर सांगे. उत्तर कळले तर 'फुस्स' ! गूढाचे असे नसते. खरे म्हणजे गूढाला असे टक्क उत्तरच नसते. तसे ते असते तर त्याला गूढ कोणी म्हटले तरी असते का?

'क्लिष्टता' हा शब्दही असाच फसवा आहे. क्लिष्टता म्हणजे गूढता नव्हे. दुरान्वय, अपरिचित शब्द, अपरिचित संदर्भ किंवा वाचकाचे अल्पज्ञान यामुळे क्लिष्टता हा दोष निर्माण होत असतो. विठ्ठल, मोरोपंत, सावरकर, मर्ढेकर, चित्रे इत्यादी कवींमध्ये वाचकांस क्लिष्टता जाणवते. 'अलिकुल वहनाचे वहन आणीत होते' (विठ्ठल) याचा अर्थ 'ज्या कमळांवर भुंगे बसतात व जे कमळ पाण्यावर असते, असे पाणी मी आणीत होते.' ही सहेतुक क्लिष्टता सहजासहजी कुणास उकलेल? 'दशमुखमुखमलजलनिधि खलपती पंक्तित कीचक बसावा' (मोरोपंत) याचा अर्थ 'कीचक रावणासारखा दुष्ट आहे;' हा याचा अर्थ कितीजणांना कळेल ? 'पायलन्स', 'रडार', 'बेकलायटी' हे मर्ढेकरी शब्द ५० वर्षांपूर्वीच्या मराठी वाचकाला कुठे कळत होते? 'मेडुसाची नजर', ग्रीक पुराणकथा माहीत नसल्यामुळे, पूर्वी आपणांस कुठे कळत होती ? गदिमा, सुरेश भट यांच्या काव्यांत अशी क्लिष्टता- मग ती काव्य सापेक्ष असो की रसिक-सापेक्ष असो- कधीच दिसणार नाही. त्यांच्या काव्यात क्लिष्टता हा काव्यदोष तर नाहीच; उलट प्रासादिकता हा काव्यगुण मात्र ओतप्रोत असतो, हे सांगावयास नकोच.

असंबद्धता आणि संदिग्धता यांच्यामुळेही अनेकदा काव्यात दुर्बोधता येते. कूटता कवी जाणूनबुजूनच आणत असतो; तिथे तो अभिव्यक्तीशी क्रीडा करीत असतो. क्लिष्टता कधी जाणीवपूर्वक असते; तर कधी कवीच्या स्वभावदोषातून, भाषादोषातून ती निर्माण होत असते. अध्यापकाने थोडे बौद्धिक श्रम घेतले की ती क्लिष्टता सहज दूर होते. आपले. मास्तर किती हुशार आहेत असे छात्रांनाही मग वाटू लागते ! संदिग्धता-असंबद्धता हे वैगुण्य भाषासापेक्ष नसून कविप्रतिभासापेक्ष आहे. भाषा

प्रभुत्वाचा अभाव, लेखनाची घाई, प्रतिपाद्याची अपुरी जाण, नशापाणी, मनोविकृती अशी त्याची अनेक कारणे संभवतात. अशा कवितांचा अर्थ काढण्याची चढाओढ अनेकदा वाचकांमध्ये दिसून येते : त्यात प्रत्येकजण आपल्या बुद्धिकौशल्यावर व युक्तिवादप्रावीण्यावर खूष होत असतो; मानसशास्त्रज्ञ तर यांत आघाडीवर असतात! तो त्या कवितेचा अर्थ नसतो- ते कवितेचे आकलन नसते. कवीच्या अंतर्मनाचे ते आकलन असते. माणसाचे अंतर्मन कळणे व कवितेचे अंतर्मन कळणे या दोन प्रक्रियांमध्ये कोटिभिन्नता असते.

गूढता या साऱ्याहून भिन्न असते.

कधी गूढाचाच अनुभव कवीला आविष्कृत करायचा असतो. 'अवचिता परिमळु', 'पांडुरंगकांती', 'रुणुझुणु' इत्यादी माऊलीचे अभंग गूढानुभवाशीच संबंधित आहेत. अशा प्रसंगी वाचकाने काय करायचे ? त्याने त्या गूढाचाच अनुभव घ्यायचा. गूढ सुबोध झाले तर ते गूढ राहीलच कसे ? पथ्य फक्त एवढेच की तो गूढानुभव भाषेमार्फत आला पाहिजे. अतींद्रिय अनुभव मानसगोचर झाला पाहिजे.

अर्थबहुलता हे श्रेष्ठ कव्याचे एक महत्त्वाचे लक्षण आहे. श्रेष्ठ कवितेत वाच्यार्थ, लक्ष्यार्थ, तात्पर्यार्थ, व्यंग्यार्थ अशी अर्थांची परस्परपूरक वलये असतात. म्हणूनतर काव्यभाषा 'अर्थसमृद्ध' असते असे म्हटले जाते. 'इतक्या कमी शब्दांत इतका अर्थ मावलाच कसा?' असा विस्मय म्हणूनतर वाचकाच्या मनात निर्माण होत असतो; म्हणूनतर काव्य वाचताना वाचकास 'अनुभवसमृद्धीचा' प्रत्यय येत असतो; त्यामुळेही तो विस्मित होत असतो.

गूढवादी कवितेमध्ये ही प्रक्रिया अधिक व्यामिश्र व अधिक सूक्ष्म असते. ज्ञानेश्वर-तुकाराम, केशवसुत, बी-बालकवी, मर्ढेकर-चित्रे यांच्या गूढवादी कविता आपणांस इतक्या का भावतात ते ह्या सूक्ष व्यामिश्र प्रक्रियेला समजून घेतल्याशिवाय कळणार नाही.

❖❖❖

**डॉ. द. भि. कुलकर्णी**
'वसुधा-ई-००४', डीएस्के विश्‍व, सिंहगड रोड, धायरी,
पुणे ४१. फोन : (०२०) २४३८०८९४

---







(आस्वाद)

# 'तेथे चल राणी'

प्रा. एम्. पी. पाटील

प्रस्तुत कविता 'गज्जलांजली' या काव्यसंग्रहातील. माधव जुलियन या 'रोमँटिक' कवीची.

गझलात अभिप्रेत असलेली प्रीतीची उत्कट भाववृत्ती तीमध्ये प्रतीत होतेच. आणि 'गॉडस् गुड मॅन' मधील ॲडर्ली या स्वच्छंदी नायकावरून स्वीकारलेल्या 'जुलियन' या नामाधिनात अभिप्रेत असलेल्या स्वच्छंदतावादी विमुक्त भाववृत्तीचाही ही कविता अनुभव देते. याचबरोबर गझलात अभिप्रेत असलेल्या आणि माधवरावांना स्वाकारार्ह वाटणाऱ्या अन्य सामाजिक व मानवी मूल्यांचाही ही कविता अनुभव देत असते. शिवाय नियम, व्यवस्था, बंधने आणि अपमूल्ये यांचा धिक्कार, जे स्वच्छंदतावादी विचारसरणीशी व माधवरावांच्या व्यक्तिवादी बंडखोर वृत्तीशी सुसंगत असते, यांचाही ही कविता अनुभव देत असते.

चरित्रमूल समीक्षादृष्टीने जरी आपण या कवितेकडे पाहावयाचे नाही असे ठरविले, तरी माधवरावांच्या पूर्वायुष्यातील प्रेमाचे तत्त्वज्ञान, फर्ग्युसन कॉलेजमधली गैरसमजाने झालेली अवहेलना, नोकरीसाठीची वणवण, आशा-निराशा, बाळगलेली मूल्ये, अपूर्त इच्छा-आकांक्षा यांबद्दलच्या अनेक घटना आपल्या मनात वावरत असतातच. या कवितेचा अनुभव घेताना, कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजमधील सहकारी प्रा. ना. सी. फडके यांच्या साहित्यसंबंधित इच्छापूर्ती सिद्धांतांचाही संदर्भ मनात येऊन जातोच.

या कवितेतील कवितागत 'मी'चा सभोवतालच्या ज्ञात समाजात एक प्रकारचा कोंडमारा झालेला आहे. त्याच्या स्वातंत्र्याला, प्रीतीला अडसर निर्माण केला गेला आहे. त्यामुळे शांती ढळून त्याला अस्वस्थतेने घेरलेले आहे. अशा कोंडमारा झालेल्या अभावग्रस्त अगतिक मनोवस्थेतून सुटका होण्यासाठी, जिथे स्वातंत्र्य, शांती, प्रीती वसत आहे, अशा कल्पनारम्य अज्ञात प्रदेशात स्वैर विहार करण्यासाठी, लवकरात लवकर, एखाद्या विमानात बसून जाऊया असे त्याचे त्याच्या कल्पनेतील प्रेयसीला सर्वेच्छा-पूर्तीसाठीचे उत्कट भावाचे आवाहन आहे.

धृपदातील या कल्पनारम्य भावाशयाशी संवादी भावलय साधणाऱ्या शेवटल्या तीन कडव्यात, त्या अज्ञात कल्पनारम्य प्रदेशात, आपण ते स्वातंत्र्य, शांती आणि प्रेमभरले मुक्त जीवन कसे जगावयाचे, त्याचे रम्य चित्र रेखाटले आहे- जिथे असूया नाही, जिथे मानसिक समाधान-संपत्तीत कसलीही न्यूनता नाही. जिथे केवळ संतोष आहे, अशा त्या रम्य प्रदेशातील रम्य रानात आपण बसू, हसू, विहार करू. तिथे छोटे चिमणे खोपट बांधू ज्यात आपल्याला स्वर्गीय प्रणयाची ऊब मिळेल. त्या रम्य रानातील आपले ते छोटे-चिमणे घरकुल असे मानवी नाते सांभाळणारे असेल, की जे अनिकेतांसाठी-गृहहीनांसाठी सदैव स्वागतशील असेल. या घरकुलाच्या सभोवतीच्या रानातील सृष्टिसतीच्या मांडीवर बसून आपण आपल्या स्वत्वाचा विकास करू; कसा ?... तर जे कुराण आणि पुराण आदी धर्मग्रंथांमध्ये नाही, अशा अध्यात्मापलीकडील गूढ कथांचा शोध घेत, त्यातील जीवनसत्ये शिकत, आपल्या स्वत्वाचा विकास करीत आपण अनन्यसाधारण जीवन जगू.

धृपद आणि त्याच्याशी संवादी असलेली ही शेवटची तीन कडवी, याखेरीजची मधली बारा कडवी विरोधी अर्थलयाचा बंध साधीत रचलेली आहेत.

या कडव्यांमध्ये सर्वसाधारणपणे पहिल्या ओळीत, भोवतीच्या ज्ञात जगातील धिक्कार करावीत अशी अपमूल्ये आणि दुसऱ्या ओळीत या कवितागत 'मी'ला स्वीकारार्ह वाटणारी आदर्श मानवी मूल्ये, असा हा बंध आहे. हा बंध या 'मी'चा स्वच्छंदतावाद, आदर्शवाद, ध्येयवाद, रम्य कल्पनावाद याची प्रतीती देत असतो. त्याचबरोबर या 'मी'च्या इच्छा, आशा, आकांक्षा, तृष्णा यांच्या अपेक्षित पूर्तीचे दर्शन घडवित असतो.

या संदर्भात सामाजिक नातेबंध, प्रीती, लावण्य, लग्नविधी, स्त्रीपुरुष नाते, कष्ट, काव्य, ध्येय, सामाजिक

मानवी वर्तन अशा अनेक गोष्टींबद्दलच्या मूल्य-अपमूल्य या बाबत या कवितागत 'मी'ने आपल्या कल्पनेतील प्रिय राणीला उद्देशून केलेला हा कृतिसन्मुख स्वयंसंवाद आहे.

यामध्ये न टिकणारे सामाजिक संबंध, दिखाऊ स्नेह, धनलक्ष्यी प्रेम, गुणांची अवहेलना, दिखाऊ सौंदर्य, प्रेमविहीन विवाहबंधन, विशुद्ध स्त्रीपुरुष नात्याचा विपर्यास, फसवा लाडिकपणा, पोटात दडलेला संशय, कुत्सित टीका, स्वातंत्र्याला अटकाव करणारी सत्ता, संभावितपणा, दंभ, स्वार्थ, अन्याय, चैन, बडेजाव, कष्टाविनाचे जीवन, अधर्म, नीरस काव्य, दारिद्र्य अशा अनेक ज्ञात समाजातील अपमूल्यांचा धिक्कार केला आहे.

आणि स्वातंत्र्य, शांती, स्त्रीपुरुषांच्या अद्वैती प्रीतीस अशारीर प्रीती, स्त्रीपुरुष युग्माचे लग्नविधी खेरीजचेही जीवैक्य, अस्सल लावण्य, साधेपण, ध्येयवाद, निःस्वार्थी अभिव्यक्ती, न्यायआधारित समाजजीवन, कष्टाळू राहाणी, कष्टार्जित स्वादिष्ट भाकरपाणी, फेसाळत गाणाऱ्या ओहळासारखे उत्स्फूर्त फेसाळते काव्य, सर्वांसाठी धनधान्य, या जीवनवादी मानवी मूल्यांचा जयघोष केला आहे.

एकूण 'काय आहे' यापेक्षा 'काय असावे' अशा कल्पनारम्य जीवनाची आसक्ती या कवितागत 'मी'ने त्याच्या काल्पनिक राणीला उद्देशून केलेल्या स्वयंसंवादात व्यक्त केली आहे. थोडे कवितेच्या रुपाबद्दल :

प्रारंभीच्या एका परिच्छेदात लिहिल्यानुसार धृपदातील भावाशयाशी संवादी लय साधणारा शेवटल्या तीन कडव्यांचा बंध, धृपदातून मांडलेल्या कल्पनारम्य अज्ञात विश्वाची विस्ताराने प्रतीती देत असतो. तसेच तो बंध संवादी रूपसौंदर्याचीही प्रतीती देत असतो.

गझलाला अभिप्रेत असलेली या कवितेतील यमक योजना, कवितेच्या रूपसौंदर्यात मोलाची भर टाकीत असते. प्रत्येक कडव्यात दुसऱ्या ओळीतील शेवटचा न बदलणारा यमकासारखा पुनरावृत्त होणारा 'राणी' हा शब्द (रदीफ) आणि त्याच्या आधीचा बदलणारा, पण यमक साधीत आवर्तित होणारा 'अिमानी', 'निदानी', 'किराणी इ. सारखा शब्द (काफिया)- अशा यमक योजनेतून निर्माण होणारा अर्थयुक्त नादाचा ठेका, रसिकांच्या नादसंवेदनेला झोका देत, आशयाची नादार्थयुक्त घनता वाढवीत असतो. तसेच प्रत्येक ओळीतील १४व्या आणि २०व्या अक्षराशी विमानी-ठिकाणी', 'टिकाऊ-दिखाऊ', 'कुणाला-गुणाला' अशा स्वरुपाची, किंचित् यतीचा थांबा घेत साधलेली यमक-योजना, असाच घनतेचा आवर्तित परिणाम करीत असते. आणि प्रत्येक कडव्याच्या अखेरीस येणारे 'तेथे चल राणी' हे आवर्तन तर नादाच्या आणि अर्थाच्या घनतेत, ठराविक लय साधीत, प्रत्येक थांब्यावर, भर टाकीत चालत असते.

खोटे लावण्य म्हणजे चीज किराणी, गरिबीतील भाकरपाण्याला असलेली अमृताची गोडी, फेसाळती कविता म्हणजे फेसाळत्या ओहळाने गायलेली फेसाळती गाणी, रानफुलेही नसलेल्या सुकलेल्या राईसारखी गरिबी, उदास रात्रांधारात खुलणारी रत्नांची जवाहिरी- अशा साम्य वा विरोधमूलक प्रतिमांचे मोजकेच झालेले संघटन आशयाला काव्यात्मकतेचा स्पर्श देऊन जात असते.

न टिकाऊ सामाजिक संबंध, दिखाऊ स्नेह, लाडिक परि खोटी जादू, अविश्रांत चैन, विकाऊ बडेजाव, कष्टाळू रम्य राहाणी, स्वादिष्ट भाकरपाणी, नकली नीरस

काव्य, चिमणे खोपट, दैवी प्रणय, गूढ कथा-अशा विशेषण-विशेष्याच्या जोड्या अर्थाची प्रसरणशीलता आणि परिणामकारकता वाढविण्याचे काव्यात्म कार्य करीत असतात.

एकूण, व्यवस्थेचा आणि अपमूल्यांचा धिक्कार करीत, गझलाला अभिप्रेत असलेल्या 'महवुवासे स्वच्छंद बात' करणाऱ्या आवाहक प्रीतीचा आणि मानवी मूल्यांचा उद्घोष करीत संवाद-विरोधाचा लय साधलेली येथील बंदीश, रसिकाला चढत्या भावात्मकतेचा आणि रेखीव रुपसौंदर्याचा काव्यानंद देत असते.

जाता जाता एक प्रश्न मनात येऊन जातो :

जिच्याशी या 'मी'चा स्वयंसंवाद चालला आहे ती येथील 'राणी' कोण ?

'प्रिय सखी', हा तर सरलार्थ जाला.

संबंधिताच्या मनातील ही अभावग्रस्त 'तृष्णा' ?

की संबंधित पुरुषाच्या नेणीवेत असलेली ही 'अनिमा'?-

त्याला लोभवणारी जीवनोत्सुक स्त्रीत्वाची प्रतिमा ?

## तेथे चल राणी

कोठे तरि जाऊं बसुनी शीघ्र विमानीं
अज्ञात ठिकाणीं
स्वातंत्र्य जिथे, शान्ति जिथे, प्रेम इमानी
तेथे चल राणी ! ॥ तेथे० ॥
सामाजिक सम्बन्ध सखे, हे न टिकाऊ;
हे स्नेह दिखाऊ !
मी तुज, मला तू, प्रभु दोघांस निदानीं ॥ तेथे० ॥
भाळे न इथे प्रीति धनावीण कुणाला,
ना मोल गुणाला;
लावण्य नसे जेथ जणू चीज किराणी ॥ तेथे० ॥
व्हा बद्ध इथे, प्रेम करा वा न कराही,
नातें दृढ राही;
गे लग्नविधी जेथ न जीवैक्य-निशाणी ॥ तेथे० ॥
नातें पुरुषस्त्रीमधि तें एकच वाटे,
अैसें ऊफराटें;
ज्यांचें मत त्यांचें वच यावे नच कानीं ॥ तेथे० ॥
डोळ्यांत इथे लाडिक जादू परि खोटी,
अन् संशय पोटीं;
साधेपण जेथ न गमे गूण अडाणी ॥ तेथे० ॥
काहीहि करा ही जनता मारिल नाङ्गी,
हासूनि अपाङ्गी;
ध्येयास पुरा वाव मिळे, होय न हानी ॥ तेथे० ॥
स्वातंत्र्य न सत्तेविण, सम्भावितताही,
दम्भाविण नाही;
स्वार्थापुरतें सत्य न जेथे कुणि मानी ॥ तेथे० ॥
अन्याय इथे जोंवर अन्यास जहाला
तों त्रास कशाला ?
जेथ न शिणे केवळ लाभास्तव वाणी ॥ तेथे० ॥
ही चैन अविश्रांत, बडेजाव विकाऊ.
टाकूनिच जाऊं;
स्वाभाविक कष्टाळु जिथे रम्य रहाणी ॥ तेथे० ॥
ये कोठुनि कष्टाविण विश्रांति दिनान्ती,
धर्माविण शान्ती !
स्वादिष्ट सुधेहुनि जिथे भाकरपाणी ॥ तेथे० ॥
काव्यें नकलीं नीरस वाचूनि जिवाला
वाटे न जिव्हाळा;
फेसाळत गाईल जिथे ओहळ गाणीं ॥ तेथे० ॥
कोठूनि गरीबी असतां रानफुलांही
शृङ्गारित राओी ?
बेमोल जवाहीर खुले रात्र-वितानीं ॥ तेथे० ॥
कोठे तरी रानांत बसूं या नि हसूं या
जेथ न असूया !
सन्तोष पडूं दे न कुठे न्यून निधानीं ॥ तेथे० ॥
बान्धूं चिमणें खोपट की ऊब जयाची,
दैवी प्रणयाची;
आल्या अनिकेतास खुलें स्वागत रानीं ॥ तेथे० ॥
अङ्कावर खेळुनि शिकूं सृष्टिसतीच्या
आत्मग्रमतीच्या
त्या गूढ कथा ज्या न कुराणीं न पुराणीं ॥ तेथे० ॥

- माधव ज्युलियन

❖❖❖

**प्रा. एम्. पी. पाटील,**
सी २५/१५ जीवन बिमा नगर, बोरिवली. (प.) मुंबई ४०० १०३.

# 'पती न राघव; केवल नृपती' – एक शैलीवैज्ञानिक अभ्यास

डॉ. शकुंतला क्षीरसागर

"आधुनिक वाल्मिकी" हे बिरूद ग. दि. माडगूळकर यांना ज्या 'गीत रामायणा'मुळे मिळाले त्या गीत रामायणाची लोकप्रियता वादातीत आहे. मराठी रसिकांच्या मनावर या रामायणाने जी मोहिनी घातली आहे, तिला तोड नाही. ही मोहिनी शब्दांची आहे का सुरांची आहे ? गदिमा यांच्या या काव्याला ज्यांनी सुरांमध्ये बांधले आहे त्या सुधीर फडके यांनी "गीत रामायणाच्या अलौकिक यशाचे बहुतांश श्रेय गदिमा यांच्या असामान्य काव्यरचनेला दिले आहे.

प्रस्तुत लेखाच्या मथळ्याची ओळ ही गीत रामायणातील सीतेच्या तोंडच्या शेवटच्या गीतात आहे. (गीत क्र. ५५) गीत रामायणाच्या गायनाच्या कार्यक्रमात या गीताला मिळणारी दाद, श्रोत्यांच्या डोळ्यांतून घळघळ वाहणारे अश्रू आणि हुंदके या रुपात व्यक्त होते, असे आढळते. करुण रसाची परिसीमा गाठणाऱ्या या गीतात गदिमा यांनी अभिव्यक्तीची जी उंची गाठली आहे तिने रसिक वाचक, श्रोते स्तिमित होतात. म्हणून या गीताच्या शैलीचे सौंदर्य (शैली विज्ञानाच्या अंगाने) उलगडून दाखवण्याचा प्रयत्न येथे केला आहे.

या गीताचा प्रसंग वाल्मिकी रामायणात आहे. सीतात्याग या नावाने तो ओळखला जातो. परंतु हे गीत म्हणजे त्या प्रसंगाचे वर्णन करणाऱ्या मूळ संस्कृत श्लोकांचे भाषांतर आहे असे म्हणता येणार नाही. हे गीत म्हणजे गदिमा यांची स्वतंत्र निर्मिती आहे.

**ध्वनिस्तर**

दोन ओळींचे ध्रुवपद आणि प्रत्येकी चार ओळींची आठ कडवी असलेल्या या गीताच्या बांधणीत अनुप्रास आणि यमक या शब्दालंकारांची अनेक वेधक स्थळे नाद आणि लय यांची श्रवणीय निर्मिती करतात असे दिसून येते.

गदिमा हे सिद्धहस्त कवी अनुप्रास लीलया साधतात. अनुप्रासात्मक रचनेच्या काही ओळी येथे देत आहे. अधोरेखित वर्ण अनुप्रास साधतात.

पतिचरण पुन्हा मी पाहू कुठे ? ध्रु.
कठोर झाली जेथे करुणा १.१
पावक जिंके जेथे वरुणा १.४
निकसच मानी कासे कनका २.३
अग्नी ठरला असत्यवक्ता ३.१
पतिव्रता मी तरि परित्यक्ता ३.३
चरणिच्या घरेसी कंप सुटे ३.४
प्राण तनुतुन उडू पाहती ४.१
अवयव का मग भार वाहती ? ४.२
अडखळे अंतिचा विपळ कुठे ४.४
सरले जीवन, सरली सीता ५.१
पुनर्जात मी आता माता ५.२
जगेन रघुकुल - दीपाकरितां ५.३
फल धरी रूप हे, सुमन मिटे ५.४
वनात विजनी मरूभूमीवर ६.१
वाढवीन मी हा वंशांकुर ६.२
सुखात नांदो राजा रघुवर ६.३
जानकी जनातून आज उठे ६.४
जाई देवरा, पुरा मागुती ७.१
शरसे माझे स्वर मज रूपती ७.२
पती न राघव केवल नृपती ७.३
इथुन वंदिते मी मातांना ८.१
प्रणाम पोचवि रघुनाथांना ८.२
आशिर्वच तुज घे जाताना ८.३
आणखी ओठी ना शब्द फुटे ८.४

या सर्व अनुप्रासात्मक ओळींमधील विशेष वेधक वाटणारे अनुप्रास असे आहेत..

'पतिव्रता मी तरि परित्यक्ता' या ओळीत 'पतिव्रता' आणि 'परित्यक्ता' या दोन समान तोलाच्या शब्दांमध्ये नाद आणि लय यांची गुंफण आहेच. 'तरि परित्यक्ता'मधील 'रि'ची आवृत्ती श्रवणीय वाटते.

'प्राण तनूतुन उडू पाहती
अवयव का मग भार वाहती ? ४.१-२ या दोन ओळीत गदिमा नादयुक्त रचनेत किती निपुण होते याचा प्रत्यय येतो. 'तनूतुन' या शब्दांच्या जागी 'कुडीतुन' हा शब्द अर्थदृष्ट्या

तसेच वृत्तदृष्ट्याही योग्य ठरला असता. परंतु 'तनूतुन' या शब्दातील 'त' आणि 'न' या दोन वर्णांची त्याच क्रमाने होणारी आवृत्ती नादनिर्मिती करते, म्हणून त्याची निवड केली असावी. 'अवयव' या शब्दाऐवजी 'गात्रे' हा त्याच अर्थाचा आणि समान मात्रांचा शब्द इथे योजता आला असता. पण 'अवयव' या शब्दात 'व' या वर्णाची आवृत्ती नादनिर्मितीला साहाय्य करते, म्हणून 'अवयव' हा शब्द पसंत केला असावा.

या गीताच्या बांधणीचा एक विशेष नोंदवावा असे वाटते. प्रत्येक कडव्याच्या पहिल्या तीन ओळींचे एक यमक आणि शेवटच्या ओळीचे ध्रुवपदाच्या ओळींशी साधलेले यमक हा तो विशेष होय.

'पुनर्जात मी आता माता' (५.२) आणि 'जाई देवरा पुरा मागुती' (७.१) या ओळींतले अंतर्यमक लय निर्मिती करते.

**शब्दस्तर**

''पती न राघव केवल नृपती'' (७.३) या ओळीतला 'राघव' हा शब्द श्रीरामांच्या अनेक नावांपैकी एक नाव म्हणून गदिमा यांनी योजलेला नाही. तसेच 'नृपती' हा शब्दही केवळ यमकासाठी योजलेला नाही. या दोन्ही शब्दांचा संबंध गीत रामायणातल्या आधीच्या म्हणजे अनुक्रमे सतराव्या आणि पन्नासाव्या गीतांतील शब्दांशी आहे हे लक्षात घेतल्यास त्यांच्या योजनेतील औचित्य जाणवते.

'राघव' या शब्दाचा संबंध रघुवंशाशी जसा आहे तसाच गीत रामायणातल्या सीतेच्या तोंडच्या पहिल्या गीताशी आहे. (गीत क्र. १७ ध्रुवपद). दशरथ राजाच्या आज्ञेवरून वनवासाला निघालेले श्रीराम सीतेचा निरोप घेण्यासाठी तिच्या महालात येतात आणि तिचा निरोप मागतात, तेव्हा ती म्हणते, ''निरोप कसला माझा घेता ? जेथे राघव तेथे सीता ॥धृ.॥ सीतेचे हे उद्‌गार तिचा दृढ प्रेमभाव ठामपणे व्यक्त करतात. परंतु प्रस्तुत गीतात, श्रीरामांनी आपला त्याग केला आहे हे समजल्यावर सीतेवर दारुण आघात झाला आहे. म्हणून राघव हा पती नाही असे ती म्हणते.

याच ओळीतल्या ''नृपती'' या शब्दाचा संबंध गीत रामायणातल्या पन्नासाव्या गीताशी आहे. या गीतात श्रीरामांची आणि सीतेची भेट रावणवधानंतर होते, तेव्हा ते सांगतात, ''मी भयानक युद्ध केले, आणि अपराध्यांना शासन केले. जे नृपाला उचित होते तेच मी केले.'' इथला ''नृप'' प्रस्तुतच्या गीतात ''नृपती'' झाला आहे.

आपण निष्कलंक असतानाही पुन्हा एकदा राजधर्माचे पालन करण्यासाठी श्रीरामांनी आपला त्याग केला आहे; हे समजल्यानंतर सीतेच्या मनातला क्षोभ अत्यंत जळजळीत शब्दात व्यक्त करताना गदिमा यांनी 'पती न राघव केवळ नृपती' ही ओळ लिहून आपल्या बेमिसाल कवित्व शक्तीची झलक दाखवली आहे.

**व्याकरणस्तर**

पुरुषवक्रता या नावाने ओळखल्या जाणाऱ्या शैलीविशेषाची उदाहरणे या गीतम आढळतात.

स्वतःचा उल्लेख प्रथमपुरुषी न करता तृतीयपुरुषी करण्याने हा शैलीविशेष निर्माण होतो.

'सरले जीवन, सरली सीता' (५.१) आणि 'जानकी जनांतुन आज उठे' (६.४) या दोन ओळीत सीता स्वतःचा उल्लेख किती त्रयस्थपणे करते आहे; हे पाहण्यासारखे आहे.

क्रिया विशेषण अव्ययाची पुनरावृत्ती या शैलीविशेषाची उदाहरणेही या गीतात आढळतात.

मज सांग लक्ष्मणा जाउ कुठे ?<br>
पतिचरण पुन्हा मी पाहु कुठे ?





अनुक्रमणिका

या दोन ओळींमधली "कुठे ?" या क्रियाविशेषण अव्ययाची पुनरावृत्ती, सीतेच्या प्रश्नांतून व्यक्त झालेली अगतिकता, आर्तता ठळक करते.

**अलंकार**

अर्थालंकारांपैकी श्लेषाचे एक चांगले उदाहरण या गीतात आढळते. 'व्यर्थ शिणविले माता जनका (२.१) यातला जनक हा शब्द मूलतः पिता या अर्थाने वापरला आहे; पण सीतेच्या पित्याचे नावच 'जनक' असल्याने येथे श्लेष अलंकार साधला आहे.

रावणवधानंतर अग्निदिव्य करून आपले पावित्र्य सिद्ध केल्यावरही श्रीरामाने आपला त्याग केला आहे, ही वस्तुस्थिती, सीतेला अशक्य गोष्ट शक्य झाली आहे, असे वाटत आहे. तिच्या शोकाला पारावार उरला नाही. तिची व्यथा व्यक्त करण्यासाठी गदिमा यांनी दृष्टान्त या अलंकाराची मालिकाच योजली आहे.

कठोर झाली जेथे करुणा
गिळी तमिस्रा जेथे अरुणा
पावक जिंके जेथे वरुणा
जे शाश्वत त्याचा देठ तुटे १.१-४
...निकसच मानी कासे कनका
सिद्धीच तपाला आज विटे २.३-४
अग्नी ठरला असत्यवक्ता
नास्तिक ठरवी देवच भक्ता
पतिव्रता मी तरि परित्यक्ता
चरणिच्या धरेसी कंप सुटे ३.१-४

या ओळींमधली कल्पनाविलासाची झेप थक्क करणारी आहे. हे दृष्टान्त वाल्मिकी रामायणात नाहीत. गदिमा यांची ही स्वतंत्र निर्मिती आहे; या गीताचे हे एक फार मोठे वैशिष्ट्य आहे.

या गीतातला सीतेचा आक्रोश अंतःकरणाला पाझर फोडणारा आहे. गीत ऐकून किंवा वाचून संपले तरी सीतेच्या आक्रोशाने मनात उसळलेला क्षोभ शांत होत नाही.

**सीता :**

मज सांग लक्ष्मणा, जाऊ कुठे ?
पतिचरण पुन्हा मी पाहु कुठे ?

कठोर झाली जेथे करुणा
गिळी तमिस्रा जेथे अरुणा
पावक जिंके जेथे वरुणा
जे शाश्वत त्याचा देठ तुटे ॥१॥

व्यर्थ शिणविले माता जनका
मी नच जाया, नव्हे कन्यका
निकसच मानी कासे कनका
सिद्धीच तपाला आज विटे ॥२॥

अग्नी ठरला असत्य वक्ता
नास्तिक ठरवी देवच भक्ता
पतिव्रता मी तरि परित्यक्ता
चरणिच्या धरेसी कंप सुटे ॥३॥

प्राण तनूतुन उडू पाहती
अवयव का मग भार वाहती ?
बाहतसे मज श्रीभागिरथी
अडखळे अंतिचा विपळ कुठे ? ॥४॥

सरले जीवन सरली सीता
पुनर्जात मी आता माता
जगेन रघुकुल-दीपाकरिता
फल धरी रुप हे, सुमन मिटे ॥५॥

वनात विजनी मरुभूमीवर
वाढवीन मी हा वंशांकुर
सुखात नांदो राजा रघुवर
जानकी जनांतुन आज उठे ॥६॥

जाइ देवरा पुरा मागुती
शरसे माझे स्वर मज रुपती
पती न राघव केवल नृपती
बोलता पुन्हा ही जीभब थटे ॥७॥

इथुन वंदिते मी मातांना
प्रणाम पोचवि रघुनाथांना
आशिर्वच तुज घे जाताना
आणखी ओठि ना शब्द फुटे ॥८॥

(ग.दि. माडगूळकर, गीत रामायण, आ. २री, दिल्ली : पब्लिकेशन्स डिव्हिजन, पृ. १७४, १७६)

❖❖❖

**शकुंतला क्षीरसागर**
२९/४१८ लोकमान्यनगर, पोस्ट ऑफिसच्या जवळ, पुणे
४११ ०३०. दूरध्वनी : ०२०-२४३३६२०८

# 'विठोबा पाईंचि वीट'

शीला निपुणगे

*[ विठुरायाच्या दर्शनाला विविध पालख्यांच्या प्रस्थानाची गर्दी सुरू झाली आहे. दिंड्या-पताकांचे संभार पंढरीच्या दिशेने वाटचाल करीत आहेत. युगे अठ्ठावीस-करकटीवरी घेऊन-पढंरीचा राणा भक्तांसाठी विटेवरी उभा आहे. ती वीट धन्य होय; असे ज्ञानोबाला वाटते. ज्ञानोबाचे हे अंतरंग त्यांच्या अभंगांच्या आधारे, प्रस्तुत लेखात, शीला निपुणगे यांनी शोधले आहे. – संपादक ]*

पंढरपूरची वारी हा महाराष्ट्रातील भक्तिसंप्रदायाचा एकमेवाद्वितीय विशेष! प्राचीन मराठी साहित्यातील संतमंडळींनी या पंढरीचे माहात्म्य परोपरीने वर्णिले आहे. आषाढी एकादशीला नित्यनियमाने पंढरीला जाण्याची या संतांची परंपरा.

**'पंढरीचा वास । चंद्रभागें स्नान ।**
**आणिक दर्शन । विठोबाचें ॥**
**हेंचि मज घडो । जन्मजन्मांतरीं ।**
**मागणें श्रीहरी । नाहीं दुजें ॥'**

अशी विनवणी करणारे संत नामदेव, किंवा

**'पंढरीची वारी आहे माझें घरीं ।**
**आणीक न करी तीर्थव्रत ॥'**

असे निश्चयपूर्वक सांगणारे तुकाराम महाराज यांच्यासह अनेक संतकवी-कवयित्रींनी पंढरी, पंढरीची वारी, पंढरीचा विठ्ठल, त्याचे रूप आणि त्याचे नाममाहात्म्य यांविषयी भक्तिरसपूर्ण रचना केल्या आहेत.

मात्र संतांचे मेरुमणी असलेले, संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर यांनी वर्णिलेले 'पंढरीमाहात्म्य' विशेषत्वाने भावणारे आहे. ज्ञानेश्वरांच्या अलौकिक विठ्ठलभक्तीला त्यांच्या उत्तुंग प्रतिभासामर्थ्याची, अनुपम शब्दकळेची आणि विशुद्ध परमार्थप्रवणतेची जोड असल्याने त्यांच्या रचनेला एक अजोड असे परिमाण लाभले आहे.

पंढरपूरला 'माहेर' आणि विठ्ठलाला 'माउली' मानून अनेक अभंगरचना झाल्या. ज्ञानेश्वरांनीही-

**'जाईन गे माये । तया पंढरपुरा ।**
**भेटेन माहेरा । आपुलीया ॥'**

असे आंतरिक ओढीने म्हटले आहेच; परंतु पंढरपूरचे यापेक्षा आगळेवेगळे महत्त्वही त्यांनी अनेकपरींनी उलगडून दाखविले आहे.

'भूवैकुंठ' असलेली पंढरी, सर्व तीर्थांमधील तिचे श्रेष्ठत्व, विठ्ठलमहिमा, नाममाहात्म्य हे सर्व वर्णिताना ज्ञानेश्वरांच्या विठ्ठलभक्तीला परतत्त्वाचा दिव्य स्पर्श लाभलेला दिसतोच; पण ज्याने 'श्रीहरी'ची विटेवर स्थापना केली, त्या भक्त पुंडलिकाची आणि ज्या विटेला युगानुयुगे श्रीविठ्ठलाचा पावन पदस्पर्श लाभला, त्या विटेची थोरवीही ज्ञानदेवांनी मुक्तकंठाने गायिली आहे, हा त्यांच्या 'पंढरीमाहात्म्या'चा महत्त्वपूर्ण विशेष आहे.

संतसाहित्यात अनेक संतांनी विठोबाचे वर्णन 'विटेवरी उभा' असे केले आहे. संत चोखा मेळा यांची पत्नी सोयराबाई यांनी तर

**'येईं येईं बा गरुडध्वजा । विटेसहित करीन पूजा ॥'**

या शब्दांत त्या विटेविषयीचा आंतरिक पूज्यभाव ममत्वाने व्यक्त केला आहे. याच विटेला ज्ञानदेवांच्या हृदयसंपुष्टात एक अतीव जिव्हाळ्याचे, अनोखे असे स्थान आहे.

'पंढरीमाहात्म्या'त सुरुवातीला, ज्ञानेश्वर पंढरीच्या उभारणीचे वर्णन करतात-

**'येउनियां श्रीहरी । भीमेच्या तीरीं ।**
**सुदर्शनावरी पंढरी । उभविली ॥'**

श्रीहरीने स्वतः प्रत्यक्ष येऊन सुदर्शन क्षेत्रावर पंढरपूरची उभारणी केली. त्यानंतर-

**'नेणो विठो मार्ग चुकले । उघडे पंढरपुरा आले ।**
**भक्तें पुंडलिकें देखिले । उभे केलें विटेवरी ॥**

असे वर्णन ज्ञानदेव करतात आणि मग भक्त पुंडलिकाला लाभलेल्या भगवंतभेटीच्या भाग्ययोगाचे भावपूर्ण चित्रण ते करतात-

**'जन्मोजन्मींच्या सायासीं ।**
**विठ्ठल लाधला पुंडलिकासी ॥**

**पूर्वा पुण्य केलें वो माये ।**
**विटे लाधले या विठोबाचे पाये ।**
**बापरखुमादेवीवरु आहे ।**
**तया तीर्था केधवां जाती पाये ॥'**

जन्मजन्मांतरी सायास करूनच पुंडलिकाला विठ्ठलप्राप्ती झाली आणि पूर्वपुण्याईनेच त्या विटेला विठ्ठलाचा चरणस्पर्श लाभला असे 'कवतिक' ज्ञानदेव सांगतात.

जेथे या विठ्ठलाचा वास आहे त्या पंढरीला जाण्याची विलक्षण उत्कंठा लागलेली आहे !

तथापि सगुण रूपात विटेवर उभा असलेला हा विठ्ठल म्हणजे निर्गुण, निराकार ब्रह्माचे मूर्तरूप आहे ही खूण ज्ञानेश्वरांना पटलेली आहे; म्हणून ते म्हणतात-

**'आनु नेणें काहीं । विठ्ठलु स्मरे देहभावीं ॥**
**पुंडलिका हें चिंतन । म्हणोनि विटेवरी हें ब्रह्म ॥**
**रखुमादेविवरु शाहाणे । विठ्ठलु पाहुणे पुंडलिक ॥'**

विटेवरचा विठ्ठल म्हणजे दुसरे तिसरे काही नसून ते निखळ ब्रह्मरूप आहे असे सांगताना ज्ञानेश्वर विठ्ठलाच्या सगुण-निर्गुणतेचा विलक्षण सहजतेने मेळ घालतात. अशा वेळी-

**'बोलीं अरूपाचें । रूप दावीन ।**
**अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवी ॥'**

या त्यांच्या प्रतिज्ञेची सार्थता पटते.

मुळात निराकार, निर्विकल्प असलेले ब्रह्म भक्तजनांसाठी सगुण रूपात अवतरले आहे. विठ्ठलाच्या या सगुण रूपाचे वर्णनही ज्ञानदेवांनी बारकाईने आणि बहारीने केले आहे-

**'जानु जघन बरवे दिसे ।**
**ते देखोनि मन उल्हासे ।'**

असे उल्हसित होऊन सांगताना ज्ञानदेव विठ्ठलाची देहयष्टी, त्याची वस्त्राभूषणे, त्याचे अनुपम लावण्य यांचे काव्यमय वर्णन करीत जातात.

कासे पीतांबर, पायी ब्रीदाचा तोडर ल्यायलेल्या, नाभिकमळात ब्रह्मादिकांचे जन्मस्थान असलेल्या विठोबाने गोमटा शृंगार केला आहे.

अंगी चंदनाची उटी, गळा वैजयंतीमाळा आणि कानी झळाळती कुंडले धारण केलेल्या विठोबाचे वदन सुकुमार आणि वेल्हाळ दिसते आहे !

**'दंतपंक्ति झळाळ । जैसी माणिकाची कीळ ।**
**नाशिक मनोहर दिसे । जैसें वोतलेंसे मुसें ॥**
**लोचन बरवे विशाल । श्रवणीं कुंडलें झळाळ ।**
**टिळक रेखिला मृगनाभीचा । बाप राजा मन्मथाचा ॥'**

भाळी कस्तुरीतिलक रेखलेल्या पंढरीरायाचे हे लावण्य मदनालाही लाजवील असे !

विठ्ठल आणि श्रीकृष्ण ही दोन्ही विष्णूचीच रूपे. या दोघांमधील अभिन्नत्व दाखविताना ज्ञानेश्वर पंढरीच्या वर्णनात गोकुळ उभे करतात-

**'अमर तरुवर । तीर्थ सरोवर ।**
**वेणुनादी श्रीधर । खेळताती ॥**
**बागडे दाविती हरी । वाकुल्या कुसरी ।**
**तेथें पुंडलीक परोपरी । स्तवन करी ॥'**

असे हे सगुण रूपात अवतरलेले परब्रह्म ! पण मूलतः त्याला ना रंग ना रूप ! ना नाम ना गुण !

विठ्ठलाच्या या ब्रह्मरूपाचे वर्णन करताना ज्ञानदेवांची लेखणी परतत्त्वाचा अमृतस्पर्श लेऊन येते-

**'जे माये अविद्ये वेगळें । गुणत्रया नातळे ।**
**काळें गोरें ना सांवळें । निर्धारितां नेणवे ॥**
**जें द्वैताद्वैताहूनि परतें । जे सुखातें वाढवितें ।**
**योगी लक्षी लक्षित ज्यातें । परि नेणवे सर्वथा ॥**
**जें रूपा अरूपा वेगळें । सहस्त्रनामाहूनि आगळें ।**
**परमकृपेचें कोंवळें । क्रियाकर्मांविरहित ॥'**

रंग-रूप-नाम-गुण यांच्या अतीत असलेले, द्वैत आणि अद्वैताच्याही पार असलेले, परमसुखाची वृद्धी करणारे, योगीजनांनाही नाकळणारे, क्रियाकर्मरहित असे जे परब्रह्म, तेच कृपाळूपणे, विठ्ठलरूपाने पंढरीत अवतरले आहे, असा स्पष्ट निर्वाळा येथे ज्ञानेश्वर देतात.

हे विठ्ठलरूप म्हणजे 'ब्रह्मरसाचें गोठलें' आहे आणि ते 'पंढरिये प्रगटलें' आहे असेही ते म्हणतात.

ब्रह्मतत्त्वाचा ठाव घेतेवेळी द्वैत-अद्वैताचा अनोखा मेळ घालतानाच ज्ञानेश्वर मोक्षप्राप्तीचाही मंत्र देतात-

**'दुजें द्वैत सांडी । एकतत्त्व मांडी ।**
**अद्वैत ब्रह्मांडीं । पैसु कीजे ॥**
**तें रूप पंढरी । पुंडलिका द्वारीं ।**

**मुक्तिमार्ग चारी । वश्य रया ॥'**

पुंडलिकाच्या द्वारीं विटेवर ठाकलेलें, ब्रह्मांडाला व्यापून उरलेले हें एकतत्त्व ! याच्या योगे चारही मुक्तींची द्वारे खुली झाली नाहीत तरच नवल !

**'देवाचिये द्वारीं । उभा क्षणभरीं ।**
**तेणें मुक्ति-चारी । साधियेल्या ॥'**

या हरिपाठातील अभंगात ज्ञानदेवांनी हेच गहन तत्त्व सर्वसामान्यांसाठी किती सोपे करून सांगितले आहे!

विटेवरचे हे ब्रह्म काही आजकालचे नाही. ते अठ्ठावीस युगे विटेवर उभे आहे-

**'हें नव्हे आजिकालचें । युगा अठ्ठाविसाचें ।**
**मज निर्धारितां साचें । हा मृत्युलोकुचि नव्हे ॥'**

जेथे युगानुयुगे हे परब्रह्म विटेवर उभे ठाकले आहे, ती पंढरी म्हणजे भूलोक नव्हेच !

**'पंढरी म्हणजे भूवैकुंठ ।**
**ब्रह्म तंव उभेंचि दिसताहे नीट ॥'**

अशी पंढरीची अलौकिकता वर्णन करतानाच ज्ञानेश्वर म्हणतात की, सर्व तीर्थक्षेत्रांमध्येही पंढरपूर श्रेष्ठ आहे-

**'बाप तीर्थ पंढरी । भूवैकुंठ महीवरी ।**
**भक्त पुंडलिकाचें द्वारीं। कर कटावरी राहिला॥'**

पुंडलिकाच्या दारी, कर कटीवरी घेऊन 'विठू' विटेवर उभा ठाकला, तेव्हापासून पंढरीला पृथ्वीवरच्या वैकुंठाची महती प्राप्त झाली; त्यामुळेच पंढरपूर हे सर्व तीर्थांचे तीर्थ आहे. इतर कोणत्याच तीर्थस्थानाला पांडुरंगाच्या पंढरीची सर नाही-

**'काशी अयोध्या अवंति कांति ।**
**मथुरा माया गोमती ।**
**ऐशीं तीर्थें इत्यादिकें आहेती ।**
**परी सरी न पवती पांडुरंगीं ॥'**

विटेवर विठूराजा उभा आहे, अशा पंढरीची वारी आमच्याने सोडवत नाही, असे अंतःकरणापासून सांगताना ज्ञानेश्वर म्हणतात-

**'आम्हां न संडवे पंढरी ।**
**विठ्ठलराज विटेवरी ॥...'**

पंढरीची वारी म्हणजे वैकुंठप्राप्ती ! असा दृढ विश्वास धरावा असेही ज्ञानदेव सांगतात-

**'हाचि मानिरे विश्वासु । येर सांडिरे हव्यासु ।**
**तूं पाहासि वैकुंठवासु । तरि तू जाय पंढरिये ॥'**

सर्वच संतांच्या उपदेशामागे जनसामान्यांच्या उद्धाराची तळमळ आहे. त्यासाठी सदाचाराची कास धरावी, दुराचार सोडून द्यावा, षड्रिपूंचा त्याग करावा असे संतांचे नेहमीच सांगणे असते. येथेही 'येर सांडिरे हव्यासु।'' असे म्हणताना ज्ञानदेवांचा हाच हेतू आहे-

वैकुंठप्राप्तीची आस असेल, तर तुम्ही अवश्य पंढरीला जा; पण जाताना नको तो हव्यास सोडून द्या, असे सांगताना ज्ञानेश्वर विषयसुखात दंग असलेल्यांचा, कुमार्गाने जाणाऱ्यांचा तीव्र शब्दात निषेध करतात-

**'भिकेची आवडी । तया नावडे पंढरी ॥'**

ज्याला पंढरीविषयी प्रेम नाही तो करंटाच ! त्याची लक्षणे म्हणजे-

**'आपण ना करी यात्रा । दुजियासि जावो नेदी ॥**
**विषयाचा लंपट । शिकवी कुविद्या कुबुद्धी ॥**
**ऐसे जे जन्मोनि नर । भोगिती अघोर ।**
**न करिती तीर्थयात्रा । तयां नाहीं बिढार ॥...'**

जे स्वतः तर पंढरीची वारी करीत नाहीतच; पण दुसऱ्यांनाही करू देत नाहीत, स्वतः विषयलोलुप राहून इतरांनाही कुमार्गाने नेतात, असे अघोरीपणाने भोग घेणारे जे कोणी आहेत, त्यांना कुठेच थारा नसतो, असा स्पष्ट इशारा देऊन ज्ञानेश्वर निद्रिस्त जनांना जागृत करतात-

**'उठा उठा जागा पाठीं भय आलें मोठें ।**
**पंढरीवाचुनि दुजा ठाव नाही कोठें ॥'**

भवभयातून मुक्ती हवी असेल, तर पंढरीवाचून इतर कोठेच आसरा मिळणार नाही !

ज्ञानदेव आणि नामदेव यांनी इतर संतमंडळींसह एकत्रित तीर्थयात्रा केल्या. पंढरीच्या वाळवंटात प्रवचन-कीर्तन-नामसंकीर्तन केले आणि त्यातून लोकोद्धाराचे महान कार्य केले.

**'या हरिदासांसि वाळुवंट । जागरणासी दीधलें ॥'**

सामान्य लोकांचे अज्ञान फेडून त्यांना डोळस भक्तिप्रेमाचा, समभावाचा संदेश देऊन जागे करावे यासाठीच भगवंताने आम्हाला हे वाळवंट दिले आहे, हे ज्ञानेश्वरांचे उद्गार खरोखर किती सार्थ आहेत ! त्यांच्या दृष्टीने-

'दिंडी टाळ घोळ गरुडटकियाचे भार ।
वैष्णवांचे गजर जिये नगरीं ॥'

अशी पंढरी तिन्हीं लोकांमध्ये अमर आणि दुर्लभ आहे! त्यामुळेच-

'पंढरीसी कीर्तनें करी ।
पुंडलिकासी नमस्कारी ।
विठ्ठलचरण अंतरीं धरी ।
धन्य जन्म तयाचा ॥'

असा नरजन्माचे सार्थक करण्याचा मार्ग ते दाखवितात.

पंढरीच्या वारकऱ्याच्या अंतरी फक्त विशुद्ध भक्तिभाव हवा. जप, तप, अनुष्ठान, क्रिया, कर्म या गोष्टींची तेथे जरूर नाही. निष्काम भक्तिभावनेने तेथे जाणाऱ्याला पुंडलिकाप्रमाणे निखळ, अलौकिक आनंदाची आपोआप प्राप्ती होते !

'भक्तिमार्ग फुकटा । आनंदाची पव्हे ।
लागलीसे सवे । पुंडलिका ॥'

भक्त पुंडलिकाच्या या परम भाग्याचे रहस्य काय ?

भगवान विष्णूने स्वये त्याच्या भेटीसाठी यावे आणि मातापित्यांच्या सेवेत मग्न असलेल्या पुंडलिकाने त्याच्यासाठी सहजपणे जवळची वीट पुढे करावी...! आश्चर्य म्हणजे भगवंतानेही पुंडलिकाच्या भेटीसाठी युगानुयुगे विटेवर तिष्ठत उभे राहावे...!

पुंडलिकाच्या या महद्भाग्याचे रहस्य ज्ञानदेव मग निवृत्तिनाथांनाच विचारतात-

'ज्ञानदेव निवृत्ति पुसतसे कोडें ।
पुंडलिकें केवढें भाग्य केलें ॥'



पुंडलिकाला एवढे थोर भाग्य कसे लाभले असे ज्ञानदेव कोडकौतुकाने निवृत्तिनाथांना विचारतात.

पुंडलिकाने दिलेल्या विटेवर उभा राहिला म्हणून विष्णूचा 'विठ्ठल' झाला. विठोबा' झाला ! म्हणूनच या विटेचा महिमा अगाध ! भगवंताच्या पदस्पर्शाने वीट पावन झाली ! म्हणून पुंडलिकाबरोबरच या विटेची महतीही ज्ञानेश्वर वारंवार सांगतात.

या विटेविषयी अंतरंगात उचंबळून आलेल्या भावनांचा ज्ञानदेवांनी आपल्या एका अभंगात अत्युत्कट आविष्कार केलेला आहे. ते म्हणतात की, कितीही तीर्थाटने केली, व्रत-अनुष्ठाने केली तरी पांडुरंगाचा चरणस्पर्श अहर्निश अनुभवणाऱ्या या विटेचे भाग्य आपल्याला लाभणार नाही.

'वाराणसी यात्रे जाईन । प्रयाग तीर्थ पाहीन ।
त्रिवेणिये स्नान करीन । परि मी वीट नव्हेन ॥
गोदावरी यात्रे जाईन । बारा वरुषाचें फळ लाहीन।
अब्जकतीर्थीं स्नान करीन । परि मी वीट नव्हेन॥'

याच रीतीने मल्लिकार्जुन, श्रीशैल्य, पाताळगंगा, मातापूर, सह्यगिरी, कोल्हापूर, विशाळतीर्थ अशा अनेक तीर्थयात्रांचा नामोल्लेख करून ज्ञानदेव म्हणतात की- पुण्यतीर्थी स्नान, अनुष्ठान, एक अंगुष्ठी तप असे कोणतेही, कितीही नेमधर्म आचरले, तरी विठ्ठलापायींची वीट मी कधीतरी होईन का ? ते महद्भाग्य मला कधी बरे लाभेल ?

'विठ्ठलापाईंची वीट । मी कईंबा होईन ॥...

परमार्थातील महान अधिकारी असलेल्या ज्ञानियांच्या राजाची विठ्ठलाच्या चरणस्पर्शाविषयीची ही आत्यंतिक तळमळ हेलावून टाकणारी आहे ! ज्ञानदेवांची पराकोटीची लीनता आणि त्यांच्या अंतःकरणातील असीम कोवळीक यांमुळे ही रचना हृदयंगम बनली आहे!

ज्ञानेश्वरांच्या निस्सीम विठ्ठलभक्तीतील ही उत्कटता आणि आर्तता संतपरिवारातील त्यांच्या अग्रस्थानाची पूर्णत्वाने साक्ष देणारी आहे !

❖❖❖


**शीला निपुणगे**
२ कस्तुरी सोसायटी, ३७१ब, शनिवार पेठ, पुणे ४११०३०. भ्रमणध्वनी - ९८९०३५४३६२

# कथा लिहिलीच जाणार !

मोनिका गजेंद्रगडकर

*[ मराठी कथेची स्थितीगती अजमावण्यासाठी म. सा. पत्रिकेने युवा आणि प्रौढ गटांची कथास्पर्धा आयोजित केली होती. त्या अंकासाठी वर्तमानकाळातील प्रसिद्ध कथाकारांची मते मागविली होती. त्यातील हे प्रातिनिधिक दोन कथाकार मोनिका गजेंद्रगडकर आणि आसाराम लोमटे यांचे लेख ह्या अंकात प्रसिद्ध केले आहेत.– संपादक ]*

मराठी कथेबाबत आज दोन वक्तव्ये वरचे वर होऊ लागली आहेत- एक म्हणजे मराठी कथा संपली आहे वा संपत चालली आहे; आणि दुसरे म्हणजे, कथा हा साहित्याचा दुय्यम असा प्रकार आहे.

वसंतऋतूत एक कोकिळ 'कुहू' ओरडू लागला की लांबून दुसरा कोकिळ 'कुहू' म्हणत त्याला प्रतिसाद देतो. आणि मग 'कुहू कुहू' असे साद-प्रतिसाद घुमू लागतात. मराठी कथेबाबत समीक्षकांचंही असंच चालू आहे, असं मला वाटतं.

काही वर्षांपूर्वी भालचंद्र नेमाडे यांनी लघुकथा हा प्रकार निकालात काढला होता. केवळ नियतकालिकांचा मजकुर भरण्यासाठी लेखक मागणीनुसार कथा पुरवतात अशी खास 'नेमाडेपंथीय' घणाघाती टीका त्यांनी केली होती. या टीकेने मराठीतील अग्रगण्य कथाकार अस्वस्थ झाले. पण कथा हा प्रकार मात्र अस्तंगत होणारा नाही. दलित, ग्रामीण, स्त्रीवादी, विज्ञान, वास्तवदर्शी अशा आविष्कारात कथालेखन चालूच राहील. (असे वर्गीकरण करावे का नाही हा भाग वेगळा.) अशा वेगवेगळ्या दृष्टींनी मराठी कथा विकसित होत गेली. हा विकास केवळ संख्यात्मक पातळीवरचा नव्हता. त्यात अनुभवांची, आशयाची प्रगल्भता, समृद्धताही होती. या दृष्टीने मराठी कथा अधिकाधिक परीघ ओलांडत कसदारच होत गेली. अनेक दमदार कथाकार ८० च्या दशकात आणि त्यानंतरही पुढे आले. त्यांचे कथासंग्रह लक्षणीय ठरले. आज मराठी कथेने निश्चितपणे एक महत्त्वपूर्ण टप्पा गाठला आहे, असे विश्वासपूर्वक विधान करता येते, ते म्हणूनच. असे असूनही मराठी कथेबद्दलचे नैराश्यपूर्ण उद्गार समीक्षकांकडून क्वचित संपादकांकडूनही काढले जातात, याची कारणे काय असावीत ? मराठी कथांबाबतचे हे अनुमान समीक्षकांनी कोणत्या निकषांच्या आधारे काढले असावे ? त्यात खरोखरीच तथ्य आहे का ?

अगदी काहीच महिन्यांपूर्वी 'साप्ताहिक सकाळ'च्या अंकात गेल्या वर्षीच्या (२००७) दिवाळी अंकांतील दीडेकशे कथा वाचून प्रतिथयश लेखक ह. मो. मराठे यांनी मराठी कथेबद्दल काही निरीक्षणं नोंदवली होती. लेखाच्या सुरुवातीलाच ह. मों. नी गेल्या १०-१२ वर्षांत आलेले कथासंग्रह वा कथा त्यांनी वाचलेल्या नाहीत- हेही नोंदवले होते. २००७ च्या दिवाळी अंकांतील १५० कथांवरून त्यांनी आजपर्यंतच्या एकूण कथावाङ्मयाबद्दलची, कथाकारांची आणि स्त्री-कथाकारांच्या कथांबद्दलचीही मतं नोंदवली होती ! आजच्या मराठी कथांबाबत असा बारकाईने (?) अभ्यास (?) कुणी समीक्षकाने केला नाही, म्हणून संपादकांनीही हा लेख आवर्जून प्रकाशित केला होता ! केवळ दिवाळीअंकातील कथा-म्हणजे एका लेखकांची एखादी वा एखाद दुसरी कथा वाचून त्याच्याबद्दल नि एकूणच मराठी कथेबद्दल, कथालेखकांच्या अनुभवविश्वाबद्दल, शैलीबद्दल, जीवनदृष्टीबद्दल निष्कर्ष काढणं म्हणजे धाष्टर्याचाच प्रकार होता तो !

अशा प्रकारच्या गुणात्मक मूल्यमापनाने (?) मराठी कथेची उंची, विकास अजमावला जात असेल तर आम्हां नवीन पिढीच्या कथाकारांचे आणि कथाप्रकाराचेही भवितव्य फारसे चांगले नाही, हे आम्ही समजूनच घ्यायला हवे ! तर एकूणच समीक्षकांनी वा अभ्यासकांनी (काही महाविद्यालयीन परिसंवाद असतीलही घडले, पण ते आम्हां लेखकांपर्यंत पोहोचतच नाहीत.) मराठी कथा-वाङ्मयाचा गंभीरपणे विचार करून मराठी कथा कोणत्या टप्प्यावर आहे, तिचा विकास आभासात्मक आहे की एकाच बिंदूपाशी ती अडखळलेली आहे जसे विलास सारंगांच्या १९८४ सालच्या मतानुसार- 'जागतिक कथा जेटयुगात वावरताना मराठी कथा बैलगाडीच्या जगातच

समीक्षकांची उपलब्धी होती. महाराष्ट्राच्या एखाद्या खेड्यातल्या लेखकानेही चांगली कलाकृती निर्माण केली तर लगोलग त्याची दखल घेतली जायची. आता ही परंपराच मंदावली आहे. परिणामी चांगली कथा लिहिणारी किती तरी नावे मागे पडतात. जे दुय्यम आहे, कमअस्सल आहे त्याची बूज राखण्याचे काहीच कारण नाही. पण नवे आणि दमदार जर काही असेल तर त्यातली सामर्थ्यस्थळे शोधण्याची तसदी समीक्षकांनी घेतली पाहिजे.

कादंबरीच्या तुलनेत कथा हा वाङ्मयप्रकार दुय्यम म्हणून निकाली काढला जातो. कादंबरीतून विराट अशा अनुभवांचे जीवनदर्शन घडते तसे कथेतून घडत नाही हे काही अंशी खरे असले तरीही कथेचे म्हणून स्वतःचे काही एक व्यक्तिमत्त्व आहे. लेखकाचा वकूब मोठा असेल, निरीक्षणशक्ती जबरदस्त असेल आणि आपण ज्या जीवनाविषयी लिहितो, त्या जीवनाविषयी जर जिवंत आस्था असेल; तर अशी कथासुद्धा कादंबरी इतकाच परिणाम साधू शकते. प्रकाश नारायण संत, रंगनाथ पठारे, मिलिंद बोकील आदि कथालेखकांचे लेखन याची साक्ष देते. वाचकाला हलवून टाकण्याची, अस्वस्थ करण्याची आणि समृद्ध अनुभूती देण्याची ताकद ही चांगल्या कथेत असतेच. कथेला अकृत्रिम विश्वसनीयता बहाल करणारे तपशील हे कथानकाची वीण अधिक घट्ट करतात. हे तपशीलच जेव्हा तकलादू असतात; तेव्हा कथेला स्वतःची वाट सापडत नाही. अर्थात् केवळ तपशीलावर कोणतीच कलाकृती उभी रहात नाही. या तपशीलांपलीकडची एक सृष्टी लेखकाला निर्माण करावी लागते.

या सर्व पार्श्वभूमीवर आजच्या कथेवर एक कटाक्ष टाकला तर या कथेत मोठ्या प्रमाणावर वैविध्य जाणवते. चांगल्या कथेची दखल वाचक घेतात. पहिल्याच पुस्तकात लेखक म्हणून स्थिरावलेल्या कथालेखकांची संख्या मोठी आहे. वनवास, उदकाचीया आर्ती, हंस अकेला या सारख्या पहिल्याच पुस्तकांनी त्या-त्या कथालेखकांना स्वतःची ओळख करून दिली.

'इडा पिडा टळो' या माझ्या पहिल्याच पुस्तकात सहा दीर्घ कथा आहेत. व्यक्तिशः मला एखादा प्रसंग किंवा छोटासा अनुभव कथालेखनासाठी नजरेत भरत नाही. या संग्रहातल्या कथांचा अवकाशही जरा व्यापक आहे. या कथा 'स्वास्थ्यहारक' असल्याचा प्रसिद्ध लेखक रंगनाथ पठारे यांचा अभिप्राय मला खूप समर्पक वाटला. सगळी वर्गवारी टाळून आपल्याला अनुभवाला भिडता आले पाहिजे, असे मला वाटते. त्यात आपण किती यशस्वी होतो हे आपल्याला कसे सांगता येईल ? आपण ज्या काळात वावरतो त्या काळाचा तुकडा हीच लेखनाची पार्श्वभूमी असते. सध्याचा काल कथेच्या अभिव्यक्तीसाठी अनुकूल तर आहेच; पण आव्हानात्मकही आहे.

❖❖❖

**आसाराम लोमटे**
'गौरव', संभाजीनगर, परभणी - ४३१ ४०१





अनुक्रमणिका



(व्यक्तिमत्त्व)

# म.सा.प. चा निरलस कार्यकर्ता भीमराव बळवंत कुलकर्णी

म. श्री. दीक्षित

डॉ. भीमराव कुलकर्णी (एम.ए.पीएचडी.) या सर्व परिचित नावाने साहित्य वर्तुळात माहीत असणारे भीमराव हे एक बहुरंगी कर्तृत्ववान असणारे साहित्यिक होते. मराठी कथा, कादंबरी, समीक्षा आणि संपादन या चार विषयात त्यांचे वैशिष्टपूर्ण लेखन आहे.

प्रा. डॉ. भीमराव यांचा जन्म ४-११-१९३३ आणि मृत्यू २८-९-१९८७ रोजीचा. मृत्यूसमयी त्यांचे वय च्यौपन्न होते. त्यांच्या अकाली मृत्यूमुळे सर्वांनाच मोठी चुटपूट लागली. स.प. महाविद्यालय (पुणे), मॉडर्न महाविद्यालय विभाग प्रमुख (१३ वर्षे, पुणे) आणि ना. दा. ठाकरसी विद्यापीठ, मुंबई या ठिकाणी त्यांनी अध्यापनाचे कार्य केले आणि ते करता करता १५-१६ छोटेमोठे ग्रंथही लिहिले. डॉ. भीमराव यांचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे साहित्य संस्थात्मक कार्याची त्यांना विलक्षण आवड होती. जवळजवळ १५-१६ वर्षे त्यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि मुंबई मराठी साहित्य संघ, गिरगाव या दोन साहित्य संस्थांची मनोभावे सेवा केली. अ. भा. मराठी साहित्य संमेलनातही त्याचं नेहमी सहकार्य असे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह (१९७०-७३) कार्याध्यक्ष (१९७३-७६) आणि महाराष्ट्र साहित्य पत्रिका या त्रैमासिकाचे संपादक (१९८२-८५), म्हणजे पंधरा वर्षे पदाधिकारी या नात्याने त्यांचा संस्थेशी जिव्हाळ्याचा संबंध होता. १९८६-८७ या काळात ना. दा. ठा. विद्यापीठात (मुंबई) अध्यापकाची नोकरी धरल्यामुळे साहजिकच मुंबई मराठी साहित्य संघाच्या कार्यात ते रस घेऊ लागले. प्रा. गंगाधर गाडगीळ (अध्यक्ष) आणि भीमराव (कार्यवाह) अशी उत्तम जोडी त्या काळात जमली होती. ऑक्टोबर १९८६ मध्ये मुंबईला जे साठावे अ. भा. मराठी साहित्य संमेलन (अध्यक्ष विश्राम बेडेकर) भरले होते ते गंगाधर गाडगीळ आणि भीमराव या दोघांच्याच मुख्यतः कर्तृत्वाने. या संमेलनाच्या यशस्वीतेसाठी भीमराव राबराब राबले होते. आपल्या देहात कॅन्सरने प्रवेश केलाय याचेसुद्धा त्यांनी भान ठेवले नाही. या संमेलनानंतर वर्षभरातच त्यांना मृत्यूने गाठले. त्यांचा स्वभाव महत्त्वाकांक्षी आणि विलक्षण धडपड्या होता. भीमरावांना शेवटी अ. भा. म. सा. महामंडळाचे अध्यक्ष व्हायचे होते. त्याप्रमाणे ते झालेही. पण मंडळाच्या पहिल्या सभेलाच त्यांना इतरांना सावरत आणावे लागते. यानंतर आठवड्याने ते मृत्यू पावले. खरे तर मृत्यू त्यांनी ओढवून घेतला.

महत्त्वाकांक्षी, प्रांजळ, कष्टाळू, कुठे थांबावे हे न कळणारी माणसं अकाली मृत्यू ओढवून घेतात की काय कुणास ठाऊक ! प्रा. स. शि. भावे, प्रा. नरहर कुरुंदकर आणि भीमराव या तिघा बुद्धिमान, पण अति आकांक्षी व्यक्तींचा मृत्यू हा असा झालेला आहे. अध्यापनात आणि कर्तृत्वात हे तिघेही प्रसिद्ध होते. डॉ. भीमराव यांच्या साहित्यिक वर्तुळातील कामगिरीचा आढावा घेतल्यानंतर आता त्यांनी केलेल्या प्रत्यक्ष लेखन-संपादन कार्याचा परिचय करून घेऊ.

डॉ. भीमराव यांच्या नावावर १५-१६ लहानमोठे ग्रंथ आहेत. त्यातील बहुतेक संपादनात्मक असून 'मराठी फार्स' (१९८७) १९ वे शतक हा तर संकलात्मक आहे. मराठी साहित्य संमेलनाध्यक्षांची भाषणे (खंड १ ते ३) हा ग्रंथसुद्धा संकलनात्मकच आहे. 'साहित्य पत्रिकेतील लेखनाची सूची' हा ग्रंथ त्यांनी पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाच्या साहाय्याने सिद्ध केला. १९७० मध्ये साहित्य परिषदेच्या हीरकमहोत्सवाचे प्रसंगी त्यांनी जो स्वतंत्र सचित्र स्मरणिका संपादित केली ती उत्तम आणि संग्राह्य आहे. डॉ. भीमराव यांना अनेक विषयात रस होता. भाषा, व्याकरण, शुद्धलेखन या विषयांतही त्यांना गति होती. वक्तृत्वकला आणि शिकविण्याची हातोटी या दोन गुणांमुळे विद्यार्थीवर्ग त्यांच्यावर खूष असे. 'हरि नारायण' ही हरिभाऊ आपटे यांच्या जीवनावर लिहिलेली

कादंबरी ही त्यांची एकमेव स्वतंत्र अशी कलाकृती आहे. चरित्रात्मक कादंबरी लिहिण्याचा त्यांचा हा प्रयोग यशस्वी ठरला यात शंका नाही. स्वामी विवेकानंद आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर हा दोन चरित्रे स्वतंत्र असून ती मुख्यतः कुमार वाचकांसाठी लिहिलेली वाटतात. 'मराठी गद्याचा पूर्वरंग' आणि 'शास्त्रीय मराठी व्याकरण' हे त्यांच्या नावावरील ग्रंथ प्रायः जुन्या ग्रंथांचे पुनर्मुद्रण आहे. प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांनी 'शास्त्रीय मराठी व्याकरणा'चे विस्तृत प्रस्तावनेसह पुनर्मुद्रण केले आहे ते पहावयास भीमराव हवे होते.

डॉ. भीमराव यांचे खरे सामर्थ्य स्वतंत्र लेखनात नव्हते, तर संपादनात होते. या क्षेत्रात ते खरोखरी वाघ होते. 'अच्युत बळवंत कोल्हटकर : वाङ्मय दर्शन' (१९६२), वाङ्मयीन रसास्वाद (१९६५), सं. सौभद्र, आमचे जीवन आमच्या स्मृती (१९६६), भाऊसाहेबांची बखर (१९६६), श्री शिवाजी महाराज यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र (१९६७), संपूर्ण वाग्वैजयंती (१९८५), वामन पंडितांची सुधाकाव्ये (१९८५), मराठी वाङ्मय चर्चा आणि चिकित्सा (समीक्षा) अशी त्यांची उत्तम संपादने आहेत. जुन्या-नव्या ग्रंथांच्या संपादनात ते निश्चितच यशस्वी ठरले. पण इतके सारे ग्रंथलेखन आणि संपादन करून डॉ. भीमराव यांचे मराठी साहित्यात नेमके स्थान कोणते हे ठामपणे सांगणे कठीण आहे. चरित्रकार, कादंबरीकार, संकलक, संपादक अशा विविध नात्याने त्यांनी तळमळीने सेवा केली. चरित्रकार न. र. फाटक, डॉ. द. न. गोखले आणि कथा-कादंबरीकार व्यंकटेश माडगूळकर यांच्या पंक्तीत संपादक भीमराव बसू शकतील का ? त्यांचे खरे बळ संपादनात होते आणि त्याखालोखाल समीक्षेत होते.

डॉ. भीमराव कुलकर्णी साहित्यक्षेत्रातले मोठे कार्यकर्ते होते आणि यातच त्यांचे मोठेपण होते. संस्थात्मक कार्य करताना त्यांनी बहुविध लेखन-संपादन केलं ही कौतुकास्पद, अभिमानास्पद गोष्ट आहे. त्यांना आणखी आयुष्य लाभते तर स्वतंत्र ग्रंथलेखन त्यांनी केलंही असतं. पण संस्थात्मक कार्यातच ते अधिक रमले. त्यांचे माघारी श्री. राजेंद्र बनहट्टी आणि राजा फडणीस या दोन कार्यकर्त्यांनी 'साहित्य पत्रिके'द्वारा आवाहन करून एक निधी जमविला. त्या निधीच्यां व्याजातून प्रतिवर्षी एका साहित्य क्षेत्रात काम करणाऱ्या आदर्श कार्यकर्त्याला १९८९ पासून 'डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार' (रु. एक हजाराचा) संस्थेच्या वर्धापनदिनी दिला जातो. माझं सुदैव असं की, १९८९ या वर्षीचा पहिला पुरस्कार मला देण्यात आला. त्यांचे बरोबर म. सा. परिषदेची १२-१३ वर्षे सेवा करण्याची मला संधी लाभली. भीमरावांसारखे वाहून घेणारे कार्यकर्ते असतात म्हणून साहित्यसंस्था चालत असतात. अन्यथा संस्था अकार्यक्षम तरी होतात नाहीतर बंद पडतात. या दृष्टीने कार्यकर्ता आणि साहित्यिक या दोन्ही नात्याने त्यांचे कार्य आदर्शवत् होते.

डॉ. भीमराव यांच्या पत्नी श्रीमती कुंदाताई हयात आहेत. उभयतांना एक सुपुत्र आणि दोन विवाहित कन्या आहेत. चि. बाळ भीमराव कुलकर्णी हे 'स्ट्रक्चरल इंजिनिअर' आहेत.



**म. श्री. दीक्षित**
भालचंद्र हाईटस्, ८४७ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०
दूरभाष : ०२०-२४४७७८३७

## पुढील अंक ३३० विषयी निवेदन

पुढील अंक नाट्यविशेषांक असून त्यात नाट्य कलाकृती (फॉर्म) वर आधारित अभ्यासकांचे लेख असतील. या विषयात अभ्यास असणाऱ्यांनी यासंबंधीचे लेख ३१ जुलै २००९ पर्यंत खालील पत्त्यावर पाठवावेत.

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**
(संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका)
७ गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर.
संपर्क : ९७६७६९९३१९.
E-mail : suprakulkarni@gmail.com



अनुक्रमणिका



## मराठी रंगभूमी आणि गोमंतकाचं देणं – भिकू पै आंगले

डॉ. अशोक कामत

*[ भिकू पै आंगले हे एक चांगले अभिनेते. जवळपास पाऊणशे वर्षांचा त्यांचा मराठी रंगभूमीचा अनुभव. त्यांच्या या नव्या ग्रंथात मराठी रंगभूमीचा आजवरचा प्रवास अधिक स्पष्ट करीत त्यांनी या प्रवासात असलेला गोमंतकीयांचा मौलिक वाटा प्रभावी रीतीने सांगितला आहे.*

*गोमंतक आजही देवमंदिरांची भूमी म्हणून आदर्श आहे. इथं संत-भक्तांविषयी विशेष जिव्हाळा आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या अखेरीस मराठीतील आध्यात्मिक/पारमार्थिक नाटकांचाही उद्‌बोधक परामर्श घेण्यात आला आहे. ]*

प्राचार्य भिकू पै, आंगले हे बी.ए.बी.टी. होऊन पस्तीस वर्षे माध्यमिक शिक्षक होते. पुढे नाशिकच्या गोखले एज्युकेशन सोसायटीच्या ओझर येथील प्रशाला-उपमहाविद्यालयाचे प्राचार्य झाले. १९८१ मध्ये निवृत्त झाल्यावर ते मडगावच्या विद्या विकास मंडळ संस्थेचे कार्यकारी सचिव म्हणून सात वर्षे काम पाहात होते. नंतर मठग्रामस्थ हिंदू सभेने चालविलेल्या शिक्षण संस्थेचे सल्लागार म्हणून काम पाहिले. असा किमान अर्धशतकाचा त्यांचा शैक्षणिक व प्रशासकीय कार्यानुभव. त्यांचे शिक्षणविषयक चिंतन-मनन प्रयोग वाचनीय आहेत.

भिकू पै जसे हाडाचे शिक्षक तसेच ते एक चांगले अभिनेते, दिग्दर्शक. गोवा हिंदू असोसिएशनच्या कला विभागाचे सक्रिय कार्यकर्ते. गोवा कला अकादमीने आयोजित केलेल्या ग्रामीण नाट्य शिबिरातील त्यांचा सहभाग, महाराष्ट्र राज्य स्पर्धेसाठी नाटके सादर करून अभिनय-दिग्दर्शनाची विविध पारितोषिक प्राप्त करण्याचे कर्तृत्व, राज्य स्पर्धांसाठी परीक्षक म्हणून कार्यही उल्लेखनीय आहे.

आंगले यांचे हे पुस्तक म्हणजे एकूण मराठी रंगभूमीचा साक्षेपाने घेतलेला संक्षिप्त आढावा तर आहे, पण त्यात भिकूबाबा यांनी भर दिला आहे, तो गोमंतकातील उत्सवी रंगभूमीवर आणि गोमंतकीय नटश्रेष्ठांनी मराठी रंगभूमीवर उमटविलेल्या कायमच्या ठशांवर. या लेखनामागे लेखकाचा १९३३ ते २००८ असा पाऊणशे वर्षांचा रंगभूमीवरचा अखंड प्रवास आहे; आणि आपल्या पूर्वसूरींना कृतज्ञतापूर्वक केलेला मानाचा मुजराही आहे.

**मराठी रंगभूमीचा उदय**

आरंभी मराठी रंगभूमीच्या उदयाची चर्चा येते. इ.स. १६९० पासून म्हणजे तंजावरच्या भोसले राजांनी पंचवीस नाटके लिहून ती सादर केली, तेव्हापासून हा इतिहास घ्यानी घ्यायला हवा. यासाठी लेखकाने ज. स. सुखठणकर यांचा आधार घेतला असला तरी त्यात सुखठणकर यांच्या समर्थनार्थ काही उदाहरणेही जोडली आहेत.

भरतमुनींच्या नाटकांपासून आणि नाट्यशास्त्रापासून सुरुवात करून, अण्णासाहेब किर्लोस्करांनी पुण्यात सादर केलेले संगीत शाकुंतल, त्यातील दुष्यंताची एकशेआठ पदे, पुढे नारायणराव बालगंधर्वांचा विलक्षण प्रभाव. नाट्याचार्य खाडिलकरांच्या उठावदार नाटकांचा काळ, केशवराव भोसले यांच्या 'ललित कलादर्श'चा जोश, मास्टर दीनानाथांनी घडविलेला चमत्कार, त्यांची नाटक कंपनी, 'बलवंत संगीत मंडळीचे' कार्य, 'गंधर्व कंपनी' आणि 'ललितकलादर्श' या नाट्यसंस्थेतील दोन बुजुर्ग गोमंतकीय गायनाचार्य, असा एकेक विषय सादर करीत लेखक १९३२ पासून सुरू झालेल्या चित्रपटयुगाकडे वळतो.

तीच तीच नाटके, संगीत नाटकातून गाण्याचे अवडंबर, मो. ग. रांगणेकरांच्या नाट्यनिकेतनने केलेली उत्क्रांती, काही मोठे नट चित्रपटाकडे वळणे, अ.ना. भालेरावांनी नाट्यमहोत्सव करून चैतन्य आणणे, राज्य नाट्यस्पर्धा आणि हौशी नाट्यसंस्थांचा उगम, मुंबई मराठी साहित्यसंघाची नाट्यभरारी, मास्टर दत्ताराम वळवईकर यांची एकतानता, भाऊबंदकी आणि अन्य काही नाटकांनी गाजविलेले दिवस - असा सारा इतिहास सांगत लेखक चित्रपटांमुळे रंगभूमी कशी पूर्णतः हरली नाही; हे दाखवून देतो. पुढे साठोत्तरी रंगभूमीचा आढावा घेऊन लेखक गोमंतकातील मराठी उत्सवी रंगभूमीच्या

वाटचालीकडे वळतो.

**गोमंतकीय अभिनेते**

गोमंतकांने फार मोठा नटवर्ग मराठी व्यावसायिक रंगभूमीला दिला. रामभाऊ किंजवडेकर, मास्टर दीनानाथ, रघुवीर आणि प्रसाद सावकार हे पितापुत्र तर वसंत आणि गोपीनाथ सावकार बंधू, नरहरी वळवईकर, गोविंदराव माशेलकर, श्रीपाद नेवरेकर, रघुवीर नेवरेकर, मास्टर दत्ताराम, गोपाळकृष्ण भोळे, सुरेश हळदणकर अशी ही श्रेय नामावली खूपच मोठी आहे.

गोमंतक ही देवदेवतांच्या मंदिरवास्तूंनी आणि तेथील उत्सवांनी निरंतर गजबजलेली रसिक-भाविक कलावंत सारस्वतांची भूमी आहे. आजही इथं दरवर्षी दोन हजार नाट्यप्रयोग होत असतात.

गोमंतकातील उत्सवी नाट्यप्रयोगांची गमतीदार कहाणी लेखकाने मोठ्या नाट्यमयरीतीने सादर केली आहे. ती मुळातूनच वाचायला हवी. (पृ. ७९ ते ८७)

व्यावसायिक मराठी संगीत रंगभूमीशी गोमंतकाचे नाते अतूट आहे. लेखकाने अत्यंत ठसठशीत शब्दात हे नाते सप्रमाण सांगितले आहे. (पृ. ८७ ते ९२) पुढे मराठी रंगमंचावरील गोमंतकीय कलावंतांची वैशिष्ट्यसंपन्न भरारीही त्यांनी चपखलपणे मांडून मडगावच्या सांस्कृतिक समृद्धीचा सार्थ निर्देश केला आहे. (पृ. ९४-९९)

**मराठी रंगभूमी आणि महिला**

१८८० ते १९३५ या पहिल्या कालखंडात कमलाबाई आणि हिराबाई बडोदेकर या दोन स्त्रियांचा अपवाद वगळता स्त्रीभूमिका पुरुषांनीच केल्या. भाऊराव कोल्हटकरांपासून मास्टर नरेश, काशिनाथ शिरोडकर यांच्यापर्यंत स्त्रीपार्टी नटांची एक मोठी परंपराच दिसे. १९०५ ते १९३३ बालगंधर्वांनी आपल्या स्त्री-भूमिकांनी मराठी रंगभूमी गाजविली. रघुवीर सावकारांनी गाजविलेली 'रेवती'ची भूमिका १९२६ साली कमलाबाई बडोदेकर यांनी तर १९३० साली सुभद्रेच्या भूमिकेमुळे हिराबाईंनी रंगभूमी जिंकली. पुढे पुढे शांता आपटे, मानसी शिरोडकर, विमल कर्नाटकी, शांता मोडक, जयमाला शिलेदार इत्यादी अभिनेत्रींनी जुन्या मराठी नाटकांना नवे जीवनच दिले. वनमालेनं आपल्या कौशल्यानं रंगभूमी जिंकली. दुर्गा खोटे यांनी आपल्या भारदस्त अभिनयानं गाजविली. यावद्दल लेखकाने लिहिले आहे, "त्यांचे व्यक्तिमत्त्व म्हणजे अपूर्वाई. चित्रपटसृष्टीतल्या पदार्पणाने त्यांनी जबरदस्त क्रांती घडवून आणली होती. सोवळ्या ओवळ्यांच्या जिभा पार टाळूंना चिकटून बसवल्या. त्यांची आनंदीबाई अजरामर ठरली." (पृ. १०३)

पुढे स्नेहप्रभा प्रधान बऱ्याच चमकल्या. सुहासिनी मुळगावकरांनी अपूर्व पराक्रमच गाजविला. १९५४ नंतर रंगायनच्या विजया मेहता (जयवंत खोटे) यांच्या विविध प्रयोगांतून आणि भूमिकांमुळे रंगभूमी समृद्ध झाली.

आशालता वाबगावकर, ललिता जोगळेकर (शिंक्रे), शांता जोग, भक्ती बर्वे, सुहास जोशी, सुधा करमरकर, लता नार्वेकर इत्यादी कलावंत नायिकांच्या कार्यावर अतिशय मार्मिक प्रकाशझोत लेखकाने टाकला आहे.

**संतांचा अमोल ठेवा**

या ग्रंथातील नवे प्रकरण मराठी रंगभूमीला लाभलेल्या संतांच्या आध्यात्मिक ठेव्याविषयींचे आहे.

संत दामाजी (१९०४), रामदास नाटक (१९०४), संत सखुबाई (१९११), संगीत सती पिंगला (१९१९), संत भानुदास (१९१९), तुलसीदास नाटक (१९२८), संत कान्होपात्रा (१९३१), समर्थांचा महाराष्ट्र (१९३३), संत तुकाराम (१९५१), तुका आकाशाएवढा, विठ्ठल तो आला आला (१९६१) इत्यादी दुर्मिळ प्रकाशित नाटकांची चर्चा लेखकाने अत्यंत अभ्यासू वृत्तीने आणि चिकित्सापूर्वक केलेली आहे. त्यांचे काही निष्कर्ष फार महत्त्वाचे वाटतात : "भक्तांच्या संकटांचे निराकरण करणे; आणि एकरूप होऊन भगवंताशी विलीन होणे, हा आशय प्रतिबिंबित झाला आहे. पण संगीत विभागामध्ये एक जबरदस्त उत्क्रांती घडून यायला ही संतव्यक्तींवरील नाटके कारणीभूत ठरली." (पृ. ११६)

शास्त्रीय तानबाजीचा जरा अतिरेकच होत होता. अशावेळी संतांचे भावपूर्ण अभंग आणि भक्तिसंगीत आल्यामुळे नाटकांना एक उदात्तता प्राप्त झाली. सोज्ज्वळ, सात्त्विक आणि आध्यात्मिक वातावरणही प्रेक्षागृहात अनुभवता येऊ लागले. बाहेरही नाट्य संगीताच्या मैफिलींतून भक्तिरसाचे अभंग आले. मैफिली अधिक रंगल्या.



अनुक्रमणिका

"सर्वात मोठी क्रांती म्हणजे मराठी रंगभूमीवर संतांवरील नाटके स्थिरावली. प्रयोगही बेसुमार वाढत गेले."

"ही नाटके केवळ भागवत धर्माचा प्रचार-प्रसार करण्यासाठी लिहिली गेली नाहीत; तर संतांच्या जीवनात आलेले प्रसंग नाट्यमय करून रंगभूमीच्या लौकिकात भर घालावी, रंगभूमीचे वैभव वाढवावे, प्रेक्षकांपर्यंत श्रद्धायुक्त भक्तीवर आधारित नाटके सादर करावीत आणि नाट्यरसिकांना एक वेगळा नाट्यानंद द्यावा, हाच प्रधान आणि एकमेव हेतू असावा."

असे लेखकाला वाटतेच, पण मराठमोळ्या चालीरीती, त्यांची संस्कृती, वारकरी पंथाची कालक्रमणा, दिंड्या, भजन, लोकनृत्य, इत्यादींसह पालख्यांची मिरवणूक, हालअपेष्टा सहन करीत पंढरपूरला जाऊन विठोबाचे दर्शन घेण्याची अतीव इच्छाशक्ती हे सारं प्रयोगांच्याद्वारा प्रेक्षकांसमोर मांडले गेले, त्यात कदाचित् लेखकांचा समाजप्रबोधन करण्याचा प्रामाणिक हेतूही असावा." (पृ. ११७)

**समारोप**

एकूण हे छोटेखानी पुस्तक. अल्पाक्षररमणीय संदर्भ ग्रंथासारखे आहे. यातील विषय-वैविध्य, संक्षेप-साक्षेप आणि मार्मिक टीकाटिपण्णी मनोज्ञ वाटले.

मराठी रंगभूमीच्या आजवरच्या इतिहासाची ठळक वैशिष्ट्ये, तिचा सर्वसमावेशक प्रभाव आणि गोमंतकीयांनी केलेली तिची सेवा; यांची अभ्यासपूर्ण ओळख या ग्रंथातून घडते. भिकू पै. आंगले यांचे मनःपूर्वक अभिनंदन !

❖❖❖

प्रकाशक : सौ. लक्ष्मी भि. पै. आंगले, मडगाव, गोवा. प्रथमावृत्ती, जुलै २००८, पृष्ठ १४२ सुमारे चाळीस दुर्मिळ छायाचित्रे. चिकित्सक प्रस्तावना, संदर्भमूल्य असणारी परिशिष्टे. आणि चौकटी- मूल्य १५०/-

**डॉ. अशोक कामत**
'शिवश्री', २५७, सहजीवन सहकारनगर क्र. २,
पर्वती, पुणे ४११ ००९.
फोन : ०२०-२४२२२४९५

## नवे आजीव सभासद (नांदगांव शाखा जि. नाशिक)

१) गिळाणकर दयाराम दामू
२) साळवे सचिन जयवंत
३) नारायणे सुरेश माधवराव
४) गुंजाळ भिका ठकाजी
५) कुलकर्णी भारती यशवंत
६) पाटील चारूलता प्रभाकर
७) साळी वाल्हू गणपत
८) बारसे शालिनी कचेश्वर
९) देशपांडे स्वाती प्रदिप
१०) नावरकर नरेंद्र रामभाऊ
११) मिसर जयंत नारायण
१२) ढेपे शेखर एकनाथ
१३) पाटील प्रकाश रामचंद्र
१४) जगताप भास्कर दामू
१५) कवडे मधुकर रामचंद्र
१६) नारायणे अलका सुरेश
१७) गोपलानी जयेश भागचंद
१८) कदम अशोक कारभारी
१९) पाटील वैभव नानासाहेब
२०) चव्हाण राजेंद्र वाल्मिकी
२१) मोरे किरण मुरलीधर
२२) साबळे गौतम मच्छिंद्र
२३) गवळी काशिनाथ महादु
२४) पगार वैष्णव विलास
२५) पगार सीमा विलास
२६) बोरसे शांताराम दैवराम
२७) गुंजाळ धनाजी केदार
२८) वाघ संजय रघुनाथ
२९) निकम दिगंबर पांडुरंग
३०) दीनकर निंबल महादू
३१) वागळे किशोर शंकरराव
३२) चव्हाण बारकू श्रावण
३३) सोळुंके ईश्वर प्रतापसिंग
३४) पोतदार सोमनाथ ओंकार
३५) कापडणीस जयवंत प्रकाश
३६) थोरात जितेन्द्र मोतीराम
३७) शिवदे संजय उत्तम
३८) घोडके रमेश शिवाजी
३९) मगरे दीपक शिवराम
४०) पाटील हेमंत माधवराव
४१) गमे भाऊसाहेब विठ्ठल
४२) देवरे रमेश कृष्णा
४३) पवार गौतम तळीराम
४४) साबळे प्रशांत ओंकार
४५) कांबळे रवींद्र कचरू
४६) खेडकर मिलिंद दशरथ
४७) डोनवडे काशिनाथ तुकाराम
४८) सळिवे अरुण रंगनाथ
४९) निकम पुष्कर
५०) घुगे श्रीराम जयराम
५१) भोसले दिनेश दशरथ (पाचोरा)
५२) हिंगमिरे सुनील शिवलिंग (सावरगांव)
५३) काकळीज भारत दौलत (सावरगांव)

❖ ❖ ❖



अनुक्रमणिका

ग्रंथ परिचय

# भारतीय स्त्रीचा सांस्कृतिक दस्ताऐवज 'भारतीय भाषांतील स्त्रीसाहित्याचा मागोवा'

डॉ. उज्ज्वला गोखले

'भारतीय भाषांमधील स्त्रीसाहित्याचा मागोवा' इ.स. १८५० ते २००० हा साहित्यप्रेमी भगिनीमंडळाने पूर्ण केलेला द्विखंडात्मक प्रकल्प आहे. या दोन खंडांत मिळून वीस भाषांमधील गेल्या दीडशे वर्षातील स्त्रीसाहित्याचा मागोवा घेण्यात आला आहे. या प्रकल्पामुळे भारतभरातील स्त्री-साहित्याचा विकासक्रम, स्त्रीसाहित्याची प्रतिमा, तिच्यातील परिवर्तनाचे टप्पे, त्यांतून व्यक्त होणारे स्त्रीजीवन वाचकांसमोर आले आहे.

**प्रकल्पाचा संकल्प :**

शांताबाई किर्लोस्कर यांच्या सूचनेवरून विविध भाषांमधील स्त्रियांनी लिहिलेल्या साहित्यावर साहित्यप्रेमी भगिनीमंडळात काही व्याख्याने आयोजित केली गेली. या व्याख्यानांमधून त्या-त्या भाषेतील स्त्रियांनी लिहिलेल्या वैविध्यपूर्ण आणि समृद्ध अशा साहित्याची माहिती मिळाली. त्यांच्या साहित्याची परंपरा आणि महत्त्वाच्या लेखिका यांचा परिचय घडला. साहित्यप्रेमी भगिनीमंडळाने मराठी भाषेतील 'स्त्री-साहित्याचा मागोवा' घेण्याचे काम यशस्वीरित्या पूर्ण केले होते. पुढच्या प्रकल्पासठी मोठी झेप घेण्याचे ठरले. त्यामुळे हाच विषय व्यापक प्रमाणावर घ्यावा असा निर्णय घेऊन त्याचा कालखंडही निश्चित केला गेला. आणि तो पूर्णही झाला. वाङ्मयाच्या इतिहासात स्त्रियांनी लिहिलेल्या साहित्याची पुरेशी दखल घेतली जात नव्हती त्यामुळे या प्रकल्पाने मोठीच कामगिरी पार पाडली आहे. यामुळे अभ्यासकांना, संशोधकांना भारतीय भाषांमधील स्त्री-साहित्याचा एकत्रितपणे अभ्यास करता येईल. तौलनिक साहित्याच्या अभ्यासासाठीही हा प्रकल्प उपयुक्त ठरणार आहे.




**संपादक मंडळाचे योगदान :**

वीस भाषांमधील स्त्री-साहित्याविषयीचा प्रकल्प पूर्ण करणे हे सांघिक कामच होते. व्यासंगी अभ्यासक कै. डॉ. सरोजिनी वैद्य, डॉ. द. दि. पुंडे व डॉ. लीला दीक्षित यांचे सहकार्य आणि मार्गदर्शन प्रकल्पाला लाभले. प्रकल्पप्रमुख आणि संपादक म्हणून प्रकल्पाची संपूर्ण जबाबदारी डॉ. मंदा खांडगे यांनी स्वीकारली. डॉ. नीलिमा गुंडी यांचे या कामात मोलाचे सहकार्य झाले. डॉ. विद्या देवधर व डॉ. निशिकांत मिरजकर यांनीही संपादनाची जबाबदारी आत्मीयतेने पार पाडली. वीस भाषांचे अभ्यासक हे विभिन्न ठिकाणी होते. या सर्व अभ्यासकांशी दूरध्वनीवरून सतत संपर्क ठेवावा लागे. डॉ. मंदा खांडगे आणि त्यांचे सर्व सहकारी या सर्वांनी मिळून हा प्रकल्प पूर्णावस्थेस नेला. दोन्ही खंडांचे संपादकीय डॉ. मंदा खांडगे यांनी लिहिले असून उपसंहार डॉ. नीलिमा गुंडी याचा आहे. पहिल्या खंडाला डॉ. निशिकांत मिरजकर आणि दुसऱ्या खंडाला द. प. जोशी (हैद्राबाद) यांची प्रस्तावना लाभली आहे.

**वीस भाषांमधील साहित्य :**

या प्रकल्पातील पहिल्या खंडात हिंदी, बाँगला, असमिया, काश्मिरी, डोंगरी, गुजराती, पंजाबी, मैथिली, राजस्थानी व संस्कृत या प्रामुख्याने उत्तरेकडील भाषांमधील साहित्याचा समावेश आहे. दुसऱ्या खंडात उर्दू, ओडिया, मराठी, कन्नड, कोकणी, तमिळ, तेलुगु, मलयाळम्, सिंधी

व इंग्लिश या पूर्व आणि दक्षिण भारतातील भाषांचा विचार केला आहे. या विविध भाषांमधील स्त्रीसाहित्याच्या आलेखातून भारतीय स्त्रीच्या सामाजिक स्थितीगतीचे, पर्यायाने तिच्या विकासाचे, साहित्यनिर्मितीस कारणीभूत झालेल्या पार्श्वभूमीचे, स्त्रीपुढे असणाऱ्या विविध आव्हानांचे एक पृथक चित्र साकार होते.

विविध भाषांमधील स्त्रियांनी लिहिलेल्या साहित्याचा हा अभ्यास आहे. अनेक अभ्यासकांचे विविध दृष्टिकोनातून केलेले लेखन यात आहे. या सर्व अभ्यासात सुसूत्रता यावी यासाठी प्रत्येक भाषेची पूर्वपीठिका, स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर कालखंड या पद्धतीने साहित्याचा विचार केला जावा असे सूत्र निश्चित केले गेले. या प्रकल्पात त्या भाषेतील कथा, कादंबरी ललितेतर गद्य, बालसाहित्य अशा साहित्यप्रकारांचा मागोबा घेण्यात आला आहे. स्त्रियांच्या साहित्याचे योगदान, त्यांच्या साहित्याचे वेगळेपण, स्थिती-गतीचे भान ठेवून केलेले लेखन आणि निष्कर्ष अशी मांडणी या लेखनासाठी निश्चित केली गेली व त्यानुसार लेखन केले गेले.

वीस भारतीय भाषांमधील स्त्री-साहित्याचा एकत्रितपणे विचार करताना असे लक्षात येते की, इ.स. १८५० ते २००० पर्यंत जी प्रतिकूल परिस्थिती महाराष्ट्रात होती तीच कमीअधिक फरकाने सर्व भारतभर होती. ज्या दुष्ट रुढींनी स्त्रीचे जीवन ग्रासलेले होते; त्यातील सर्वात घातक अशा बालविवाह, जरठ-बाला-विवाह, सती या प्रथांविरूद्ध सर्वत्र समाजसुधारकांनी आघाडी उघडली होती. दुसरे वैशिष्ट्य म्हणजे भारतभरात जी जी नियतकालिके होती, त्यांनी स्त्रियांच्या लेखनाला प्रोत्साहन देण्याचे काम सातत्याने केले.

ह्या अभ्यासातून असे लक्षात येते की प्रत्येक भाषेच्या स्थितीगतीचे वेगवेगळे वैशिष्ट्य आहे. उदा. संस्कृत आणि इंग्लिश भाषांना स्वतःचा असा प्रांत नाही. त्यातील साहित्य विखुरलेल्या स्वरुपात आहे. उर्दूच्याही बाबतीत हीच परिस्थिती आहे. फाळणीनंतर सिंधी भाषेला स्वतःचा प्रांत राहिला नाही. कश्मिरी लोकांबरोबर त्यांचे साहित्यही विस्थापित झाले. कोकणी भाषेला अगदी अलिकडे राजभाषा म्हणून मान्यता मिळाली. इतके दिवस तिचा अस्तित्वासाठी लढा सुरू होता. राजस्थानी, मैथिली, डोंगरी, कोकणी या भाषांमधील आधुनिक कालखंडातील लेखन गेल्या ४०-४५ वर्षांमधील आहे.

ही वेगवेगळी पार्श्वभूमी आहे. तसेच काही समान घटकही आहेत. अखिल भारतीय पातळीवर ही १५० वर्षे म्हणजे भारतीय समाजाच्या संक्रमणावस्थेचा असा हा कालखंड आहे. दोन महायुद्धे, पारतंत्र्याचा काळ, स्वातंत्र्याचा लढा, गांधीजींचा मिठाचा सत्याग्रह, १९४७ मधे देशाला मिळालेले स्वातंत्र्य या सर्व घटनांचा परिणाम भारतीय समाजावर आणि भारतीय साहित्यावरही झाला. सर्वच क्षेत्रातील सामाजिक सांस्कृतिक आर्थिक सुधारणांचा हा कालखंड असल्याने त्यातील हितकर चळवळींचा स्त्री-जीवनावर अनुकूल असा परिणाम झाला. या काळात लेखिकांचे साहित्य कसकसे विकसित होत गेले त्याचे सम्यक् चित्र यातून उभे राहाते.

***

शिक्षणाने आत्मभान आल्यावर स्त्री सजगपणाने लेखन करू लागली. भोवतालची परिस्थिती, सामाजिक घटना, राजकीय संदर्भ, विविध वाङ्मयीन परंपरा अशा विविध कारणांनी त्यांचे साहित्य प्रभावित झालेले दिसते. विशिष्ट परिस्थितीमुळे उदा. फाळणी. त्या त्या भाषेतील स्त्रियांच्या लेखनातील आशयात वेगळेपण असल्याचे जाणवते. अशा प्रकारची वैशिष्ट्ये जाणून घेताना वाचकांची दृष्टी व्यापक होत जाते. भारतीय भाषांमधील विविधता आणि आशयाचे वैविध्य जाणून घेता येते.

**सिंधी, उर्दू, पंजाबी लेखिकांच्या साहित्यातील आशयाचे वेगळेपण :**

सिंधी जनतेला परकीय आक्रमणाचे आघात वारंवार सोसावे लागले. त्या मानाने हा समाज लवकर सावरला. सिंधी लेखिका पोपटी हिरानंदाणी, रीटा शहाणी यांच्या साहित्यात मानवी मनाचे चित्रण फार प्रभावी रीतीने झालेले दिसते. पोपटी हिरानंदाणी यांच्या आत्मचरित्रात फाळणीतून निर्माण झालेल्या आघातांचे चित्रण आहे आणि कवितांमधून मातृभूमीच्या विरहाचे दुःख व्यक्त होते.

उर्दू लेखिका अकबरी बेगम यांची 'गुदड का लाल' ही ८०० पानांची कादंबरी १९०७ मध्ये प्रकाशित झाली. त्यात त्यांनी पडदा पद्धतीविरूद्ध आवाज उठवला. उच्च कुलीन हिंदुस्थानी मुस्लिम समाजाच्या सर्व समस्यांवर यात प्रकाश टाकण्यात आला. इस्मत चुगताई यांनी सार्वजनिक आणि सामाजिक जीवनातील उद्ध्वस्तता फार चांगल्या पद्धतीने

मांडली आहे. ज्ञानपीठ पारितोषिक विजेत्या पद्मविभूषण कुर्तुल ऐन हैदर यांनी आपल्या बारा कादंबऱ्यांमधून स्वातंत्र्यपूर्वकालीन सामाजिक ऐक्यभावना आणि देशाच्या फाळणीमुळे उठलेला संघर्षाचा वणवा यांचा वेध घेतला आहे.

सुनीता रैना या काश्मिरी कवयित्रीच्या कवितांमध्ये जन्मभूमीचा वियोग विस्थापन, मागे राहिलेल्या मधुर स्मृतींची दाहकता तसेच विस्थापनातील संघर्ष या गोष्टी प्रभावीपणाने व्यक्त होताना दिसतात. काश्मिरी जनतेबरोबर त्यांचे साहित्यही विस्थापित झाल्याच्या खुणा, जखमा त्यांच्या साहित्यात दिसतात.

पंजाबमधे अनेक कारणांनी निर्माण झालेली अशांतता, तरुणांमधील वाढती अस्वस्थता यांची दखल घेतलेली दिसते ती मनजित कौर तिवाना यांच्या कवितेत.

सीमा प्रदेशातील वास्तव्य, आक्रमकांचे हल्ले, फाळणी, दहशतवाद अशा अनेक अनुभवातून या लोकांना जावे लागले. त्यांच्या जीवनावर त्याचा खोलवर परिणाम झाला आणि साहित्यातही हे दुःख प्रगट झाले. अशा प्रकारच्या साहित्याचा परिचय या प्रकल्पातून घडत जातो, तेव्हा या सीमा प्रदेशातील लोकांना किती भीषण वास्तवाला सामोरे जावे लागले, त्यांचा जीवनसंघर्ष किती कठीण होता याची कल्पना येते. त्यांच्याविषयी मनात आपलेपणा आणि अभिमान दाटून येतो.

**विविध भाषांमधील लेखिकांची वैशिष्ट्ये**

मल्याळम् भाषेवर संस्कृतचा पगडा आहे; आणि पारंपरिकतेचा ठसा आहे. ख्रिश्चनांच्या प्रभावामुळे पाश्चात्य शैलीचा प्रभाव आहे. या भाषेत स्त्रीसाहित्यात मोलाची भर घालणाऱ्या जोसेफ तैय्यिल यांचा पाऊण शतकभर या भाषेवर प्रभाव टिकून होता. त्यांचा आदर्श समोर ठेवून मल्याळम् लेखिकांनी लेखन केले. सुगताकुमारी यांनी आपल्या लेखनातून केरळमधील प्रादेशिक समस्यांचे चित्रण केले. त्यांनी सायलेंट व्हॅलीची पर्यावरणवादी चळवळ साहित्यिकांच्या सहकार्याने यशस्वी केली. बहुआयामी व्यक्तिमत्त्वाच्या या लेखिला साहित्य अकादमीचा पुरस्कार आणि पद्मश्री हा किताब मिळाला.

तेलुगु भाषेत नागरत्नम् आणि अच्चंमम्बा यांनी समीक्षेच्या क्षेत्रात मोठे काम केले. मुद्दुपलानी हे काव्य नागरत्नम्मांमुळेच जगाला कळले. अच्चमाम्बा यांनी स्त्रीवादी दृष्टिकोनातून कर्तबगार महिलांच्या चरित्रांचे लेखन केले.

कन्नड भाषेतील लेखिका अनुपमा निरंजन यांचे आत्मचरित्र अतिशय गाजले. त्यांच्या कादंबऱ्यांमधील नायिका टप्प्याटप्प्याने विकसित होत गेल्या. त्या अन्यायाविरूद्ध खंबीरपणे लढा देऊन विवेकपूर्ण निर्णय घेताना दिसतात.

तमिळमध्ये डॉ. निरूपमा, बी. एन्. सुमित्रा यांचे संशोधनपर लेखन अतिशय महत्त्वाचे मानले जाते. तमिळनाडूमधील 'सुया मरीदायै' ही प्रादेशिक स्तरावरची चळवळ आणि देवदासी प्रथा याबाबत लेखिकांनी बजावलेली कामगिरी मोलाची ठरलेली दिसते.

विविध भाषांमधील लेखिकांचे साहित्य, त्यातील वैशिष्ट्ये, वेगळेपण यांविषयी, या ग्रंथातील विवेचनावरून कल्पना येते. अखिल भारतीय पातळीवरून साहित्य अकादमीच्या पुरस्काराने सन्मानित झालेल्या, पद्मश्री पद्विभूषण किताब मिळालेल्या अनेक नामवंत लेखिकांच्या कामगिरीचा परिचयही या ग्रंथातून होतो. त्यांच्या छायाचित्रांचा समावेश या ग्रंथात केल्यामुळे ग्रंथाचे मोल वाढले आहे आणि कवी तो होता कसा आननी' हे वाचकांचे कुतूहलही त्यामुळे पूर्ण होते. आदिवासींमध्ये काम करणाऱ्या व त्यांचे प्रश्न मांडणाऱ्या बांगला लेखिका महाश्वेतादेवी, निरंजनातील ज्योतीसारख्या तेवणाऱ्या महादेवी वर्मा, अन्यायकारक रूढींमुळे स्त्रियांची होणारी ससेहोलपट चित्रित करणाऱ्या इंदिरा गोस्वामी, विज्ञानविषयक नवी परिभाषा निर्माण करणाऱ्या बांगला लेखिका स्वर्णकुमारी देवी, व्होल्गा, अमृता प्रीतम, गीता नागभूषण, मनोरमा महापात्र, जयंती नायक, अनिता देसाई, कमला दास, अशा अनेक नामवंत लेखिकांच्या कामगिरीची माहिती या ग्रंथातून मिळते.

**भारतीय स्त्रीचा सांस्कृतिक दस्ताऐवज :**

विविध भारतीय भाषांमधील लेखिकांच्या साहित्याचा परिचय करून घेत असताना त्यातून अनेक वैशिष्ट्ये जाणवतात. विशेषतः कथा, कादंबरी या क्षेत्रात लेखिकांनी चांगली कामगिरी बजावली आहेत. मराठीतील स्त्रियांच्या आत्मचरित्रांचे लेखन खूपच महत्त्वपूर्ण आहे. १९४७ मध्ये मिळालेले स्वातंत्र्य आणि १९७५ चे महिलावर्ष यातून निर्माण झालेली आत्मभानाच्या शोधाची जाणीव विविध वाङ्मयप्रकारांतून प्रतिबिंबित होताना दिसते. शतकापूर्वीचे विधवांचे प्रश्न असोत; किंवा स्त्रीभ्रूणहत्या हा आजचा ज्वलंत विषय असो. विविध प्रश्नांना लेखिकांनी स्पर्श केलेला दिसतो. आज या साहित्यात स्त्री-पुरुष विषमतेला



अनुक्रमणिका

बळी पडून शोषण अनुभवलेल्या स्त्रियांचा आर्त स्वर ऐकू येतो. रागाचा विद्रोही पवित्राही कानी पडतो आणि अस्मितेचा अर्थगर्भ हुंकारही मुखरित होतो. दिलीप कौर तिवाना या पंजाबी लेखिका उपरोधाने म्हणतात, ''सर्वांत मोठा गुन्हा आहे तो म्हणजे एक कमावती एकटी स्त्री असूनही आत्मसन्मान जपणारी स्त्री असण्याचा.''

अनेक कारणांमुळे हा ग्रंथ महत्त्वाचा आणि उपयुक्त ठरणारा असा आहे. हा ग्रंथ स्त्रीवादी दृष्टिकोनातून अभ्यास करणाऱ्यांसाठी महत्त्वाचा आहे. तौलनिक साहित्य, भाषाभ्यास साहित्य, अनुवादक्षेत्र या क्षेत्रातील अभ्यासकांना या ग्रंथातून अभ्यासविषय सापडतील. अनुवादासाठी कलाकृती निवडणे शक्य होईल. संदर्भग्रंथ म्हणूनही हा ग्रंथ विविध प्रकारे उपयुक्त ठरणारा आहे. विविध भाषांमधील लेखिकांच्या साहित्याची तोंडओळख करून देऊन जिज्ञासू वाचकांच्या आकलनकक्षेत हा अभ्यासविषय आणता आला, याबद्दल संपादकांनीही समाधान व्यक्त केले आहे.

या साहित्यांचा अभ्यास म्हणजे पर्यायाने स्त्रीविकासाला आलेख ठरतो. लेखिकांनाही या ग्रंथामुळे व्यापक परिप्रेक्ष्यातून स्वतःच्या लेखनाकडे पाहणे शक्य होईल. कलात्मकतेची आव्हाने पेलताना स्वतःतील बलस्थाने आणि कमतरता यांचा अंदाज घेता येईल. एकूणच हा प्रकल्प म्हणजे भारतीय स्त्रीचा सांस्कृतिक दस्ताऐवज आहे. यामुळे भारतीय स्त्रीसाहित्यविश्व परस्पर सन्मुख होईल आणि त्यातून सांस्कृतिक अभिसरणाला गती मिळेल.

हा प्रकल्प आपल्या परंपरेतील बहुसांस्कृतिकतेच्या वैशिष्ट्यांशी सुसंगत आहे. यातील सिंधी, काश्मिरी, उर्दू, बांगला, ओडिया इत्यादी भाषांमधील लेखिकांच्या लेखनात धार्मिक, सांस्कृतिक विविधतेची संपन्नता जाणवते. परस्परांचा परिचय घडतो तेव्हाच आपुलकीची भावना निर्माण होते. हा प्रकल्प वीस भाषांना परस्परसमीप आणून ठेवत आहे. त्यातून भारतीय स्त्रीमनाचे संवेदनातरंग जाणून घेण्याची प्रक्रिया सुरू होईल. असे निश्चितपणे म्हणता येते.

या प्रकल्पाच्या इंग्रजी भाषांतरांचे कामही आता पूर्ण होत आहे. सप्टेंबर २००९ मध्ये इंग्रजी भाषेतील हे दोन्ही खंड प्रकाशित होतील. भारतीय भाषांच्या अभ्यासकांना ते उपयुक्त ठरतील असा विश्वास आहे.

---

भारतीय भाषांमधील स्त्रीसाहित्याचा मागोवा : प्रकाशक

❖❖❖

**प्रा. डॉ. उज्ज्वला गोखले**
अमोल, श्रमसाफल्य सोसायटी,
३२/२ब, एरंडवणा, पुणे ४११ ००४. फोन : २५४३३५८९

## नवे आजीव सभासद (महाबळेश्वर)

१) ढेबे बबन बाबुराव
२) दस्तुरे संजय विश्वनाथ
३) काळे विलास बाबुराव
४) पलोड शिवरतन भुरमल
५) पलोड रमेश मुरलीधर
६) खुरासणे अभिजित रामचंद्र
७) आवळे वामनराव कोंडीबा
८) तोडकर सुधाकर किसन
९) कोरे गणेश
१०) शिंदे किसन मारुती
११) पार्टे पांडुरंग दगडू
१२) बावळेकर दत्तात्रय मारुती
१३) कुंभारदरे रविंद्र मधुकर
१४) शेख युसुफ हसन
१५) सौ. भांगडीया स्वाती प्रविण
१६) तोषणीवाल रतिकांत शंकरलाल
१७) डॉ. सौ. रड्डी सुनिला मोहन
१८) भिसे नीता मुरलीधर
१९) शिंदे लीलाताई सुरेश
२०) महाबळेश्वरकर ज्योती संतोष
२१) अक्ष्यंतल गिता संदीप
२२) पाटील दिलीप रामचंद्र
२३) खक्कर अजयभाई
२४) तेजानी मनिष रमणिक
२५) राशिनकर सुनिल विष्णु
२६) आगरकर चिन्मय चंद्रशेखर
२७) कोमटी किशोर महादेव
२८) पवार विनायक भिकाजी
२९) कुंभारदरे राजेश विश्वनाथ
३०) दीक्षित ओंकार संजय
३१) वाडकर दत्तात्रय नारायण
३२) राजगुरू विनायक सूर्यकांत
३३) ढेबे राजन गंगाराम
३४) जाधव संजय यशवंत
३५) वैद्य रोहिणी रामकृष्ण
३६) रानडे अनघा रामचंद्र
३७) जोशी निलेश विजय
३८) देवकर प्रभाकर श्रीरंग
३९) गांधी शिरीश काळुराम
४०) कोमटी अनघा सुनिल
४१) डॉ. ठोके प्रकाश
४२) खुरासणे सुधाकर शंकरराव
४३) नायडू राजेंद्र संभाजी
४४) वलगे फकिर जाफर
४५) जाधव सूर्यकांत नामदेव
४६) पलोड सविता राजेंद्र
४७) पाटील स्मिता सुनिल
४८) जंगम संतोष बाळकृष्ण
४९) साळुंखे प्रकाश महादेव
५०) साळुंखे राज मधुकर

❖❖❖

# राजकारणात सकारात्मक आशावाद निर्माण करणारी कादंबरी 'सम्राज्ञी'

डॉ. राजेंद्र माने

स्त्री-प्रधान कादंबरी असली की खूपदा ती अतिकौटुंबिक बनण्याची भीती असते. मग ती कुटुंबातील नातेसंबंधावर भाष्य करत चाकोरीबद्ध होते. पण 'सम्राज्ञी' कादंबरी त्याला अपवाद आहे. महत्त्वाचं म्हणजे 'राजलक्ष्मी माने' हे पात्र लेखिकेने मोठ्या ताकदीने उभे केले आहे. तिचे व्यक्तिमत्त्व वाचकांच्या नजरेसमोर साकारत जाते आणि वाचकांच्या मनाला व्यापून रहाते. सुरुवातीपासून शेवटपर्यंत कादंबरी वाचकाला बांधून ठेवते. हे तंत्र कादंबरी लेखनाच्या दृष्टीने महत्त्वाचे असते. ते लेखिकेला साधले आहे. सहकारक्षेत्रात 'साखर कारखाना' हा महत्त्वाचा भाग. त्या त्या क्षेत्रातले राजकारण अशा कारखान्यांशी बांधील असते. समाजकारणातही ही माणसे जोडलेली असतात. या साखर कारखान्यातले राजकारण हा विषय तेजस्विनी जाधव यांनी या कादंबरीसाठी निवडला आणि शेवटपर्यंत त्या विषयाशी बांधील राहिल्या. पतीच्या पश्चात् या कारखान्याच्या चेअरमन पदाची जबाबदारी सांभाळणारी नायिका उभी करताना मराठा कुटुंबातील स्त्री, तिची वागण्याबोलण्याची पद्धत, सण-परंपरा हा सगळा भोवताल त्यांनी लक्षात घेतला आहे. महत्त्वाचं म्हणजे कादंबरीत कुठंही पसरटपणा आला नाही.

साखरकारखान्यात संचालकमंडळात वेगवेगळ्या वृत्ती-प्रवृत्तीची माणसं असतात. सत्ता-लालसा ही त्यांच्या मनाशी असतेच. त्यापायी एकमेकाच्या पायाखाली काटे पसरून पद कसं मिळवावं याचे खटाटोप चाललेले असतातच. भ्रष्टाचार हा तर तिथंही ठाण मांडून बसलेला आहेच. अगदी ऊस मोजण्याच्या काट्यापासून ते यंत्रसामग्रीच्या खरेदीपर्यंत वेगवेगळ्या ठिकाणी तो होतो. तो कसा होतो याचा पुरेसा अभ्यास लेखिकेने केला आहे. हे कादंबरी वाचताना जाणवते.

साखर कारखान्यासंबंधीत येणारी सर्व माणसे म्हणजे त्यातील संचालकं, यंत्रसामग्री दुरुस्त करणारे, ऊसतोडीचे कामगार आणि त्यांचे म्होरके, ऊस वाहतूक करणारे ट्रक व बैलगाडीचालक, कारखानाच ताब्यात घेण्याचा प्रयत्न करणारे अस्तनीतले साप. कारखाना कसा बुडेल याची वाट पहाणारे महाभाग. या सर्वांची व्यक्तिचित्रे लेखिकेने यशस्वी रीतीने उभी केली आहेत. त्यापाठी लेखिकेचे सूक्ष्म निरीक्षण जाणवते. माणसातील गुण-दोषांचा विचार लेखिकेने केलेला जाणवतो.

ऊसतोड क्षेत्र, कारखान्यांचा ऊस इतर कारखान्यांनी पळवणे, उस नसणाऱ्यालाच कर्ज मंजूर करणे, ऊसतोड कामगार पळवणे, उसतोडीचे नंबर वशिल्याने लवकर-उशीरा लावणे हे सगळे विषय लेखनात हाताळताना ऊस लवकर वा उशीरा तोडण्याचे फायदेतोटे लेखिकेने नमूद केले आहेत. त्याचबरोबर वशिल्याने असे घडू नये म्हणून काय करता येते. याच्या उपाययोजनाही दिल्या आहेत हे वैशिष्ट्य आहे. यासाठी लेखिकेने बारीक-सारीक बाबींचा विचार केल्याचे जाणवते.

'सरकार एवढं नियमानं चालत असतं तर शेतकऱ्यांनी आत्महत्या कशाला केल्या असत्या.'

असे विधान करून लेखिका सरकारी कार्यपद्धतीवर प्रश्नचिन्ह उभे करते व आत्महत्येच्या मुळाशी कुठंतरी भ्रष्ट सरकारी यंत्रणाही आहे; असे सूचित करते. चांगल्या उपाय योजनाचा निधी योग्य माणसापर्यंत पोहोचत नाही. मधल्या मध्ये त्याला वाटा फुटतात. त्याचबरोबर आमदारकीची निवडणूक, त्यातील प्रचार यंत्रणा कशी असते. ती राबवताना येणाऱ्या अडचणी कादंबरीत दाखवल्या आहेत. तिकीट मिळवण्यासाठी केले जाणारे बरे वाईट प्रयत्न आणि पक्षातील अंतर्गत बंडाळी याचंही चित्रण कादंबरीत येतं. सर्वात महत्त्वाचं म्हणजे 'राजलक्ष्मी माने' उभी करताना तिला नवऱ्याच्या पुण्याईचं पाठबळ असलं तरी तिच्या ठिकाणचा खंबीरपणा, तत्त्वनिष्ठा, सर्वसामान्यासाठी काहीतरी करण्याची तळमळ. आमदारपण मिळूनही पायी चालत आलेले मंत्रीपद नाकारून साखरकारख्यानाच व्यवस्थित सांभाळण्याचा निर्णय नायिका घेते. यातून मग नायिका

डोंगराएवढी मोठी वाटायला लागते. व्यक्तिमत्त्व खंबीरपणे साकार करण्याचं बळ लेखिकेच्या लेखणीत आहे. संवादातील ताकद थोडी कमी भासली तरी भ्रष्ट राजकारणात वावरताना स्वतः तत्त्वनिष्ठ वागून चांगुलपणा टिकवणं आणि राजकारणात सकारात्मक आशावाद निर्माण करण्याचा प्रयत्न करण्यात लेखिका यशस्वी झाली आहे. सद्य राजकीय स्थितीचा विचार करताना या गोष्टींना मोठं महत्त्व आहे. प्रबोधनात्मक विचार करतानाही या गोष्टींना मोठं महत्त्व आहे. हेच कादंबरीचं बलस्थान मानायला हरकत नाही. लेखिकेकडून आणखी वेगवेगळ्या विषयावरील कादंवरी-लेखन घडण्याची आशा करायला हरकत नाही.

❖❖❖

**डॉ. राजेंद्र माने**
आविष्कार, गौरी ड्युप्लेक्स, विसावा पार्क, सातारा.
मो. : ९४२२६०००३५

## नवे आजीव सभासद

१) अहिरे प्रविण सुकदेव, सावरगांव
२) काकळीज विलास यादवराव, वाखारी
३) चव्हाण अण्णासाहेब पांडुरंग, वाखारी
४) चव्हाण सुनील चिंधा, वाखारी
५) प्रभुणे वि. य. तथा अरुण, पुणे
६) देशपांडे चित्रा संतोष, पुणे
७) इंगळे ज्ञानदेव तुकाराम, श्रीरामपूर
८) शिकारपूर दीपक वासुदेव, पुणे
९) पाळंदे अपर्णा आनंद, पुणे
१०) दामोदरे चिंतामणी कृष्णाजी, पुणे
११) चांदसकर चिंतामणी सुधाकर, डोंबिवली
१२) धारवाडे बाबुराव (सागरमाळा)
१३) देशपांडे सुरेंद्र सुधाकर, पुणे
१४) जोशी अभिमन्यू नानासाहेब, पुणे
१५) देव गजानन लक्ष्मीकांत, पुणे
१६) फडणीस विनय प्रभाकर, पुणे
१७) दिवटे श्रीराम सुरेश (पेरणे फाटा)
१८) मोकाशी इशा उल्हास, पुणे
१९) धाटावकर सरिता मिलिंद, ठाणे
२०) जुन्नरकर दीपक गणपत, पुणे
२१) नकाते नितीन गणेश (पुणे-खडकी)
२२) रेडकर चैत्रा, पुणे
२३) जोशी सुभाष गोविंद, पुणे
२४) पानसे प्रतिमा विलास, पुणे
२५) सावंत शिवराज अजित, पुणे
२६) हुलगबाली मेधा प्रेमदीपक, पुणे
२७) बिचितकर दिनेश बलभीम, चिंचोळी
२८) मेमाणे सोनाली बबन, पुणे
२९) आफळे ज्योती प्रदीप, पुणे
३०) कासोदे प्रदीप गोविंदराव, मुक्ताईनगर
३१) गुरव अस्मिता अशोक, जळगाव
३२) चौधरी प्रमोद रामभाऊ, जळगाव
३३) पवार रमेश यशवंत, अंमळनेर
३४) पाटील प्रमिला प्रल्हादराव, पाचोरा
३५) पानपाटील दिलीप ऊखर्डु, मुक्ताईनगर
३६) पिंवटे प्रमोद रामदास,मुक्ताईनगर
३७) बागुल गोकुळ गोविंद, अंमळनेर
३८) बोदडे जयवंत सुरेश, मुक्ताईनगर
३९) सोनाळकर शेखर मधुकर, जळगांव
४०) शिंदे शिवाजी भास्कर, पाचोरा
४१) सावरकर निर्मला सुभाष, अमरावती
४२) सावरकर सुभाष दामोदर, अमरावती

## नवे आजीव सभासद (पिंपरी-चिंचवड शाखा)

१) सूर्यवंशी मधुकर सुपडु
२) सुतार (दीक्षित) बबनराव मारुती
३) परदेशी प्रकाश चंद्रकिशोर
४) ॲड. सौ. महाजन मनीषा रमेश
५) सौ. तिक्का मंजिरी अभिजीत
६) सोनवणे प्रताप पंढरीनाथ
७) आगरवाल राकेश आर.
८) सौ. आगरवाल सुरेखा राकेश
९) कदम सोमनाथ नारायण
१०) सौ. कदम शोभा सोमनाथ
११) अग्रवाल सुरेश जगदीशप्रसाद
१२) सौ. पाठक हर्षदा आर.
१३) पाठक रविंद्र एम.
१४) अग्रवाल राजेश जगदीशप्रसाद
१५) गोरखे अमित जी.
१६) भोसले दिनेश भाऊराव
१७) कोरे राजेंद्र गुरुलिंग
१८) शेख इब्राहिम करीमभाई
१९) हगवणे प्रकाश पांडुरंग
२०) यादव नितीन शशिकांत
२१) अनारसे सतीश गोरखनाथ
२२) कवितके महादेव दामोदर
२३) अडसुळ शिवाजीराव शंकरराव
२४) जगताप दत्तात्रय जगन्नाथ
२५) सौ. पेठे श्रद्धा ओमप्रकाश
२६) पेठे ओमप्रकाश पंढरीनाथ
२७) कोलते भालचंद्र नामदेव
२८) कोलते तुषार भालचंद्र
२९) सौ. कोलते सुनिता भालचंद्र
३०) सौ. रणदिवे स्नेहा अमोल
३१) डॉ. रणदिवे अमोल अनंत
३२) बिरदवडे परेश गुलाब
३३) सौ. आढाव सुरेखा शरद
३४) पाटील निलेश पंढरीनाथ
३५) चव्हाण प्रभाकर बळवंत

❋❋❋



अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण

# ‘मोहतरम्मा ते अम्मा’ – विलक्षण दाहक अनुभव

डॉ. ज्योत्स्ना आफळे

काश्मीर हे भारताचे नंदनवन. पण सध्या मात्र ते आतंकवाद्यांचा अड्डा बनले आहे. तिथला निसर्ग आहे तसाच आहे; पण तिथली माणसे मात्र असुरक्षित जीवन जगत आहेत. दहशतवाद्यांनी काश्मिरी माणसाचा सुंदर चेहरा ओरबाडून विद्रुप केला आहे. काश्मीरमधल्या दहशतवादावर, तिथल्या राजकीय, सामाजिक परिस्थितीवर अनेकांनी लेखन केले आहे. ‘मोहतरम्मा ते अम्मा’ या पुस्तकातूनही सुधा गोखले यांनी काश्मीरमधल्या दहशतवादाचे विलक्षण दाहक अनुभव लिहिले आहेत.

दहशतवादामुळे राजकीय उलथापालथ होते आहे. सामाजिक जीवन ढवळून निघते आहे. या सर्वांपेक्षा स्त्रियांचे जे लैंगिक शोषण होते आहे ते भयावह आहे. या पुस्तकामागची प्रेरणा सांगताना सुधा गोखले लिहितात, ‘‘न्याय मिळण्याची किंचितही आशा नाही. त्यांच्यावरचे अत्याचार असेच बर्फाखाली गाडले जातील. दुःख, घृणा, चीड, द्वेष या सर्व भावना थिजतील; आणि उरतील निर्विकार मनाच्या स्त्रियांची थिजलेली जिवंत प्रेते ! मी हे पाहिले. त्यांचे दुःख यातना जाणवल्या. हे कोणालातरी सांगावेसे वाटले.’’

‘बर्फात गोठलेले दुःख’ हा लेख वाचताना तर अंगावर काटा उभा राहतो. धर्म, जात, राज्य, देश, माणुसकी नसलेल्या आतंकवादाचे वेगवेगळे चटके अनेक जणींना बसले आहेत. दहशतवादी तर त्यांच्यावर बलात्कार करतातच; पण आपले फौजी लोक सुद्धा त्यांना सोडत नाहीत. ते आले की त्यांना हवे ते जेवायला द्यायचे, त्यांना दारू द्यायची; आणि त्यांनी दारू ढोसल्यावर शरीर द्यायचे. अत्यंत किळसवाणे आयुष्य या बायका जगत आहेत. आतंकवादी आले की, त्यांचे शोहर आणि इतर मर्द लोक चुपचाप बाहेर जातात. नाही तर त्यांना गोळ्या घातल्या जातात. कधी कधी तर त्यांच्यादेखतही त्यांच्या आई, बहिणी, बायको, मुलीवर बलात्कार होतो. काही गर्भवती स्त्रियांवरही ३-४ जण बलात्कार करतात. त्यांचे हाल तर बघवत नाहीत. एका कोवळ्या नऊ वर्षाच्या मुलीवर बलात्कार होतो. रक्तबंबाळ झालेल्या तिच्या शरीराचे लेखिकेने केलेले वर्णन हृदयद्रावक आहे. या कोवळ्या मुलीच्या शरीराची विटंबना पाहून तिच्या आईने आक्रोश करीत केलेले विधान भयानक आहे. ती म्हणते, ‘‘पेट के नीचे का ये दो तीन इंचका टुकडा नही होता तो मेरी बच्ची बच जाती ना !’’ या प्रश्नाला कुठल्याही स्त्रीकडे उत्तर नाही.

साझिया, शाहीन, नूर या सगळ्यांच्या वेगवेगळ्या कहाण्या काळ्या बुरख्याआड दडलेल्या आहेत. सकीनावर अनेकवेळा बलात्कार होतो. अनेकवेळा गर्भपात करून घेतल्यामुळे सकीना शरीराने नव्हे; तर मनाने पार कोलमडून गेली होती. एक दिवस आलेल्या त्या तरुणांना आईने सकीना गावी गेल्याचे सांगितले. सकीना न मिळाल्यामुळे पिसाटलेल्या ‘त्यांनी’ तिच्या आईलाच धरले आणि ‘वो नही तो येभी चलेगी’ म्हणत तिच्यावर बलात्कार केला. वासनांध झालेल्या त्या मुलांना आपली आईसुद्धा त्याक्षणी आठवली नाही. काश्मीरमधल्या स्त्रियांच्या इतक्या दारुण कहाण्या लेखिकेने वर्णिल्या आहेत.

हे भीषण वास्तव अनुभवल्यावर लेखिका विचार करते की आपण यात काय करू शकतो ? विचारांती लेखिका निर्णय घेते की या अतिरेक्यांच्या अड्ड्यावर जाऊन त्यांच्या कृत्याबद्दल जाब विचारायला हवा. ही अत्यंत धोकादायक गोष्ट होती; पण रशिदच्या साहाय्याने लेखिका अतिरेक्यापर्यंत पोचते. त्या व्यक्तींच्या सहवासातील लेखिकेचे अनुभवही मन विषण्ण करणारे आहेत. अतिरेक्यांची मागणी एकच असते, ती म्हणजे आम्हाला आमचे स्वतंत्र काश्मीर हवे आहे. लेखिकेच्या अनेक प्रश्नांची उत्तरे टाळली जातात. प्रयत्नांना यश येत नाही. या अतिरेक्यांचा बीमोड करायला जिथे सरकार असमर्थ ठरते तिथे आपल्यासारख्या सामान्य नागरिकांना कोण दाद देणार ? पण त्यांना चार समजुतीच्या गोष्टी



अनुक्रमणिका

सांगण्यासाठी त्यांच्या गोटात जाणे हे अत्यंत धाडसाचे काम होते आणि ते लेखिकेने केले त्याबद्दल त्यांचे कौतुक करायला हवे.

या सगळ्यांचा परिणाम काश्मीरमधल्या सामान्य जनतेवर होतो आहे. अतिरेक्यांनी काश्मिरी पंडितांवर भयानक अत्याचार केले; त्यामुळे ते वादी सोडून निघून गेले आहेत. हब्बाकदाल मधील त्यांच्या हवेल्या रिकाम्या पडल्या आहेत. ते निघून गेल्यामुळे इथली बुद्धिमत्ता निघून गेली आहे. त्यामुळे काश्मीरमधील सांस्कृतिक संतुलन असमतोल झाले आहे. दिवसेंदिवस विस्थापित पंडित आणि काश्मिरी मुस्लीम रहिवासी यांच्यातील दरी रुंदावत चालली आहे. दहशतवादाची मनातली सुप्त भीती हे काश्मीरमध्ये अपत्यजन्माचे प्रमाण घटण्याचे प्रमुख कारण दिसून येते आहे. हिलालखान, गफरमियाँ, शब्बीर, इकबाल, फारूक, युनुस, नाझीर या तरुण लोकांचे काश्मीरबद्दलचे विचार लेखिकेने जाणून घेतले आहेत. या तरुणांचा संतप्त सवाल आहे की एका अतिरेक्यांच्या बदल्यात मंत्र्याची मुलगी सुटू शकते; पण आमच्या मुलीबाळी मेल्या त्याचे काय? अत्यंत विदारक प्रश्न !

आत्यंतिक दारिद्र्य, नैराश्य, भोगवादी वृत्ती यातूनच काश्मीरमधली नवी पिढी दहशतवादी कशी बनत चालली आहे हे सर्फराजच्या कुटुंबकथेतून लेखिकेने दर्शविले आहे. अतिरेकी बनून 'उसपार' कडून पैसे कमावणे हे काही बेकार तरुण करू लागले आहेत. त्यासाठी पद्धतशीरपणे दहशतवादाचे शिक्षण घेत आहेत. या सगळ्यातून सर्वसामान्यांचे आयुष्य मात्र भयावह झालेले आहे.

लेखिकेने काश्मीरमध्ये एका मुस्लीम कुटुंबात चार दिवस वास्तव्य केले. तेथे रशिदसारखा नेक, सत्शील, सत्प्रवृत्त मित्र त्यांना लाभला. रशिद आणि एहसान या दाम्पत्याचे आदरातिथ्य त्यांनी अनुभवले. काश्मिरी मुस्लीम स्त्रीच्या जीवनशैलीची वर्णने या लेखसंग्रहात आलेली आहेत. काश्मिरी रीतीरिवाज, परंपरा, यांचीही माहिती दिलेली आहे. काश्मिरी मुस्लीम मंडळीचे जीवन, विचारसरणी, राहणी लेखिकेने जवळून न्याहाळले आहे.

या पुस्तकातील अधोरेखित करणारी गोष्ट म्हणजे अत्याचारपीडित स्त्रियांचे अनुभव, मनात संताप उत्पन्न करणारे विलक्षण दाहक आहेत. कारण या काश्मिरी मुस्लीम स्त्रियांची आणि आमची जात एकच आहे; ती म्हणजे 'स्त्रीजात' म्हणूनच हे पुस्तक अंतर्मुख करते.

❖❖❖

**डॉ. ज्योत्स्ना आफळे**
७६/१० 'सुयोग', शांतीशिला सोसायटी,
लॉ कॉलनी रोड, पुणे ४.

**मोहतरम्मा ते अम्मा,** सुधा गोखले, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०. प्र. आ. २००८, किंमत १२० रु.

## नवे आजीव सभासद

१) गिरी सुधा गणेश, पुणे
२) देशपांडे अजय जनार्दन, वणी
३) पवार तृप्ती संजय, पुणे
४) राऊत गणेश दत्तात्रय, पुणे
५) सिसलिया कॉव्हॉलो, ठाणे
६) केळकर संजय मुकुंद, ठाणे
७) वाघ रत्ना हेमंत, पुणे
८) वाघ हेमंत रामचंद्र, पुणे
९) दिवाण अलका मदन, पुणे
१०) दिवाण मदन, पुणे
११) भट चित्तरंजन, पुणे
१२) बासुतकर प्राजक्ता महेश, पुणे
१३) बारसोडे शुभांगी पद्माकर, पुणे
१४) पाटील वर्षा मोहन, पुणे
१५) शिवदरे वि. गु., सोलापूर
१६) पाटील सूर्यकांत सदाशिव, सोलापूर
१७) साठे वैशाली जितेन्द्र, वडाळ
१८) निबंधे उत्तरा किरण, पुणे
१९) जोग भालचंद्र मोरेश्वर, पुणे
२०) कराडे जगन, सांगली
२१) धमाल ज्ञानेश्वर रामभाऊ, पुणे
२२) टिकू अनिल सुनिल, सोलापूर
२३) नायगांवकर विकास जिनदास, सोलापूर
२४) गोरे अनिल श्रीपाद, पुणे
२५) आगटे निखिल विजय, पुणे
२६) कातडे जयश्री नामदेव, पैठण
२७) चुंगडे किशोरसिंह राजेंद्रसिंह, अमरावती
२८) कुलकर्णी-पट्टणकुडीकर बाळकृष्ण व्यंकटेश, सांगली
२९) बंब मदनलाल ताराचंद, पुणे
३०) जगताप संपदा अंकुश, पोफळी
३१) पाळंदे श्रीधर रामचंद्र, पुणे
३२) कानेटकर ज्योती अशोक, पुणे
३३) बापट संगीता सुभाष, पुणे
३४) नातु रेषा, पुणे
३५) भस्मे मुकुंद अनंत, पुणे
३६) जोशी रजनी रामचंद्र, बार्शी
३७) खांडेकर सुकृत भालचंद्र, पुणे
३८) केतकर विद्याधर केशव, पुणे
३९) फाटक श्रीकांत बापूराव, पुणे
४०) कुलकर्णी (पांडे) सतीश राजाराम, पुणे
४१) लांडगे नंदू मधुकर, पुणे
४२) हुलंगबाळी मेघा प्रेमदीपक, पुणे

❖❖❖

मार्मिक भाष्य–

# ‘आज–काल’ आणि ‘समेपासून...समेपर्यंत’ – मुकुंद संगोराम

प्रा. गणेश राऊत

‘आज-काल’ हे संपादक मुकुंद संगोराम यांचे दुसरे पुस्तक. दै. लोकसत्तामधून प्रसिद्ध होणाऱ्या ‘रागदरबारी’ या स्तंभलेखनाचे रूपांतर. ‘रागदरबारी’ मधून लेखकाने समाजात बदलत चाललेल्या घटकांचा शोध घेतला आहे. बदलत्या समाजाचे चित्र रेखाटले आहे. त्यातील निवडक ५६ लेखांचा संग्रह म्हणजे ‘आज काल’. या पुस्तकात विषयांचे वैविध्य आहे. मराठी भाषा, वाचन, साहित्य, संस्कृती, साहित्यसंमेलने, पाऊल, मराठी नाटक, संवादकौशल्ये, अस्मिता, हॅरी पॉटर, पैसा, प्लॅस्टिक, फ्लेक्स, संस्कार, खेळ, उत्सव, कॅलेंडर, बातमी, वीज, ज्ञान, पुण्यातले रस्ते, पुणे दूरचित्रवाणी असे कितीतरी विषय लेखकाने यात हाताळले आहेत. पत्रकारांना साध्याच विषयात किती मोठा आशय सापडतो याचे हे पुस्तक एक चांगले उदाहरण आहे. चुरचुरीत भाष्य, डोळ्यात घातले जाणारे अंजन, ताजी माहिती, अधिकाधिक संदर्भांनी पुस्तक सुसज्ज आहे.




पुस्तक वाचनीय झाले आहे ते त्यातील काही निरीक्षणांनी. उदा. जगात कुठेही गेलात तरी जमिनीपासून चार अंगुळे वर चालणारा माणूस म्हणजे मराठी माणूस. ग्रंथालये ही कोणत्याही समाजाच्या सांस्कृतिक अवस्थेचे प्रतिबिंब असतात. नेत्यांनी वाचन करायचे असते. परमार्थ नंतर आणि स्वार्थ प्रथम हे नवं सूत्र गेल्या पन्नास वर्षात भारतात प्रस्थापित झालेलं दिसतं. संपन्न जगण्यासाठी वर्षाचे दिवस तीनशे पासष्ठ नसतात. ही वानगीदाखल काही उदाहरणे !

या संपूर्ण पुस्तकात लेखकाची शैली म्हणून ‘मला काही सांगायचं आहे.’ अशीच आहे. लेखकाकडे असणाऱ्या माहितीला आणि विश्लेषणाला ‘रागदरबारी’ची जागा अपुरी आहे, त्यामुळेच पुस्तकाचा जन्म झाला आहे. एखाद्या साध्या घटनेतील आशय कसा ओळखावा हे पत्रकार-संपादकाकडून शिकावे. संगोरामांचे पुस्तक आपणास दृष्टिकोन देण्यात यशस्वी झाले आहे. पत्रकारांचे लेखन हे इतिहासाच्या जवळ जाणारे असते. समाजात रोजच काही ना काही छोटे-छोटे बदल होत असतात. त्या बदलांचा वेध घेऊन पत्रकार त्यावर भाष्य करत असतो. स्तंभलेखक त्यावर दर आठवड्याला किंवा स्तंभानुसार भाष्य करतो. एका अर्थाने तो इतिहास लेखनाची साधने निर्माण करीत असतो. यात पत्रकाराचा अभिनिवेश, त्याचे पूर्वग्रह, त्याचे संस्कार, धर्म, जात यांचं प्रतिबिंब पडू शकते. हे इतिहासकारही टाळू शकत नाही. आताशा लोकशाहीच्या युगात या गोष्टी बदलत जालल्या आहेत. पत्रकार-संपादक आपल्या मतांचा लंबक टोकाला नेऊ शकत नाहीत, त्यांना मध्यममार्ग स्वीकारावा लागतो. संगोराम आपल्या लेखनात कोणतीही ठाशीव, एकच-एक भूमिका घेत नाहीत हे पुस्तकात पदोपदी जाणवते. या पुस्तकातून ते अनाग्रहाचे तत्त्वज्ञान मांडतात. कोठेही आग्रह, जबरदस्ती नाही. मला जे पटले, रूचले, आवडले ते तुम्हाला सांगितले आहे. बघा जमलं तर स्वीकारा ! अशीच भूमिका सर्वत्र दिसते.

एका अर्थाने ही जागल्याची भूमिका आहे जी टिळक परंपरेशी नातं सांगते. मराठी पत्रकारितेने अजून तरी हा वसा सोडला नाही; हे आपले सुदैव आणि पत्रकारितेतील सुचिन्ह !

संगोराम आपल्या लेखनातून भूतकाळाशी सांधा जोडतात; परंतु ‘प्राप्तकाल हा विशाल भूधर, सुंदर लेणी तयात खोदा’ असे सांगणाऱ्या केशवसुतांचा वसाही घेतात. शास्त्रीय संगीताचा अभ्यास, आजूबाजूच्या

परिस्थितीचे अवलोकन, मानवी स्वभावाचे मर्म जाणणे यांमुळे संगोरामांच्या लेखनास संदर्भमूल्य प्राप्त झाले आहे. प्रकाशक दत्तात्रेय पाष्टे आणि मुखपृष्ठकार शाम भालेकर यांनी आपल्या भूमिका चोख बजावल्या आहेत.

**संगीत आणि समाजाचा शोध-**
**'समेपासून... समेपर्यंत'**

समेपासून... समेपर्यंत हे पत्रकार मुकुंद संगोराम यांचे पुस्तक शास्त्रीय संगीतात गती असणाऱ्या आणि नसणाऱ्या अशा सर्वांनाच उपयुक्त आहे. या पुस्तकात एकूण २९ लेख आहेत. हे सर्व लेख 'दै. लोकसत्ता' मध्ये वेळोवेळी प्रसिद्ध झालेले आहेत. लेखकाने त्या लेखांवर संपादकीय संस्कार करून हे पुस्तक सिद्ध केले आहे.

फक्त १२२ पृष्ठांचे हे पुस्तक छोटेखानी असले, तरी आशय आणि विचारांच्या दृष्टीने समृद्ध आहे. काहीतरी नवे मिळाल्याचा आनंद वाचकाला मिळतो, संगीताचा ऐतिहासिक आणि समाजशास्त्रीय अभ्यास कसा करता येऊ शकेल याचा वस्तुपाठ म्हणजे हे पुस्तक होय.

पहिलाच लेख 'समेपासून समेपर्यंत...' या शीर्षकाचा आहे. या लेखात गाण्याचे अमूर्त बांधकाम लेखकाने जिवंत केले आहे. गाणं सादर करण्यापूर्वीचा प्रवास ते प्रत्यक्ष गाणं हा भाग उत्कटतेनं वठला आहे. 'गाणेच का नसावे जगणे ?' या लेखात कुमार गंधर्वांच्या अचाट बुद्धिमत्तेचा प्रसंग वर्णिला आहे; तो वाचकांनी मुळातूनच वाचण्यासारखा आहे. 'रिॲलिटी शो'मधील वास्तव या निमित्ताने लेखक आपणासमोर मांडतो ते अंतर्मुख व्हायला लावणारे आहे.

'सूर ना सजे...!' या लेखात वाहिन्यांवरच्या गाण्यांच्या स्पर्धा (किंवा खरं म्हणजे भेंड्या !) यांचा लेखाजोखा घेतलेला आहे. स्पर्धक आणि परीक्षक या दोघांच्याही मनोवृत्तीवर एक वेगळाच प्रकाश टाकला आहे. 'भावनेला देऊ दे गा, शास्त्रकाट्याची कसोटी' ही मर्ढेकरांच्या कवितेतील ओळ शीर्षकात वापरली आहे. हा लेख ख्यातनाम गायिका श्रीमती किशोरी आमोणकर यांच्यावर आहे. त्यांच्याविषयी लेखक 'स्वनामधन्य' हे विशेष वापरतो ते वेगळे आहे. किशोरीताईंनी संगीताला काळाबरोबर पुढे नेले अशा शब्दात मूल्यमापन केले आहे. या लेखातील लेखकाचे महत्त्वाचे निरीक्षण म्हणजे संगीताच्या व सामाजिक बदलांचा काही संबंध आलेला 'कालाचे परिमाण देणारा प्रतिभावान गायक' या लेखात भीमसेन जोशी यांचे वेगळ्याच मापदंडाने मूल्यमापन करून त्यांचे श्रेष्ठत्व संगोरामांनी सांगितले आहे. हे मूल्यमापन गणिती पद्धतीने केले आहे. 'लाँग प्ले रेकॉर्ड आणि तीन मिनिटांत' यातील फरक वाचल्यावर आपण थक्क होतो. 'संगीत नाटकं हवीतच कशाला ?' या प्रश्नार्थक शीर्षकात संगोरामांनी अण्णासाहेब किर्लोस्करांचे मराठी रंगभूमीवरील आणि महाराष्ट्राच्या जडणघडणीतील मर्यादा आणि सामर्थ्य यांची मांडणी केली आहे.

'स्वरसिद्धी' या लेखात निर्मितीच्या भावी क्षणांना 'प्रेग्नंट पॉज' म्हटले आहे. शब्द चांगला आहे. किशोरीताईंच्या संगीतबाह्य गोष्टींची साधक-बाधक चर्चा त्यात आहे. 'काळाच्या परिघात संगीत' या लेखात भारतीय व परदेशीय चित्रपटातील संगीताची माहिती आहे. 'का हा दुरावा'... या लेखात कलावंतांच्या सर्जनशीलतेवर भाष्य केलेले आहे. 'स्वरात ओंकार भेटला गा' या लेखात सवाई गंधर्व संगीत परिसरातील भीमसेनजींच्या मैफिलीचे वर्णन आहे; ते अंगावर रोमांच उभे करते. 'शहनाईचा शहेनशहा' हा लेख कोणावर असणार हे सांगायची गरज नाही. बिस्मिल्ला खाँ विश्वनाथ मंदिरातल्या रियाजाच्या जागेतून मिळणाऱ्या ऊर्जेविषयी बोलतात- 'वैसे तो यहाँ कुछ नही है, फिर भी बहोत कुछ है', यावर अधिक भाष्य करण्याची गरज आहे काय ?

'शालीन अभिजात स्वर' हा पुनः किशोरीताईंच्या संदर्भात निसर्गाचं सुरेल रूप. 'गीतवर्षा' हा लेख कुमार गंधर्वांच्या व वसुंधराबाईंच्या कार्यक्रमाविषयी आहे. 'संगीत धर्म गंधर्वां'च्या व वसुंधराबाईंच्या कार्यक्रमाविषयी आहे. 'संगीत धर्म ज्यांचा' हा लेख माणसाच्या आयुष्यात संगीताला असणाऱ्या महत्त्वावर आहे. संगीताचे 'सवाई' विद्यापीठ या लेखात मागील लेखातील विचार पुनः आला आहे. अर्थात तो लेखकाने पुढे नेला आहे, ही गोष्ट अलाहिदा ! खऱ्या कलावंताला आणि कलेला जात-धर्म नसतो हेच खरे ! हे तत्त्व लेखकाने अधोरेखित केले आहे.

'झपूर्झा गडे झपूर्झा'... या लेखात मुकुल शिवपुत्रांच्या गाण्यातले झपाटलेपण आहे. 'प्रतिभेचे संपत्र लेणे' या लेखात 'सदारंग-अदारंग'चा शोध आहे. लेखाचा शेवट



अनुक्रमणिका

पु. लं.च्या विधानाने केला आहे. 'मी मेल्यावर माझ्या थडग्यावर एवढेच लिहा, 'या माणसाने कुमार गंधर्वांना ऐकले होते' यावर अधिक लिहिण्याची गरज आहे काय ?

'रिमिक्सचा धिंगाणा' या शीर्षकावरूनच लेखविषय लक्षात येतो. 'हे मराठीपण शोधायला हवं'... हा लेख अस्सल मराठी गाण्यांवर आहे. त्यातील सौंदर्य खुलवून दाखविले आहे. 'संगीताचं मुक्त विद्यापीठ' हा लेख सवाई गंधर्व संगीत महोत्सवावरच असणार, हे काय सांगायला हवं ! या लेखांचा मुकुटमणी शोभणारे एक वाक्य या लेखात आहे ते म्हणजे- 'मुळात संगीत म्हणजे पाण्यावरची अक्षरं', 'कलावंतानाही हवी व्यावसायिकतेची जाणीव' हा लेख पुस्तकाच्या आतापर्यंतच्या लेख विश्वातून आपणास एकदम आधुनिक कालखंडात आणतो. त्यात व्यावसायिकता आणि कलावंतांचा मूड यावर चांगले भाष्य केले आहे. 'असा बालगंधर्व आता न होणे...!'

'नृत्याचे वावडे' या लेखात मराठी माणसाच्या मनातील एका न्यूनगंडाला वाचा फोडली आहे. 'निरांजनातील वात' हा वाटवेंवरील लेख, प्रिय ए. आर. रेहमान हा पत्र स्वरुपातील लेख पुस्तकाच्या मूळ प्रकृतीपेक्षा वेगळ्या रुपात आहे. 'गुरूबिन कौन बताए बाँट' या लेखात शास्त्रीय संगीतातील गुरूपरंपरेचे महत्त्व सांगितले आहे. स्वरसंस्कार हा प्राचीन भारतातील १६ संस्कारांपेक्षा वेगळा असणारा संस्कार लेखकाने मांडला आहे. असं क्रमाक्रमाने वाढत गेलेले पुस्तक 'स्वराधीन वास्तू' या भीमसेनांच्या वरील लेखानं भैरवी गाते.

प्रकाशक दत्तात्रेय पाष्टे यांनी पुस्तक उत्तमरीत्या तयार केले; आणि मुखपृष्ठकार शाम भालेकर यांनी त्याला शालीनतेने सजविले.

❖❖❖

प्रा. गणेश राऊत
पुणे.

## निवडक नवे...

(या सदरातील परीक्षणे प्रा. मिलिंद जोशी आणि स्वाती महाळंक यांची आहेत.)

परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी विशेष उल्लेखनीय ग्रंथांचा परिचय करून देणारे सदर




**राम रंगी रंगले आणि सुंदर ते ध्यान :**

ज्येष्ठ साहित्यिक डॉ. माधव पोतदार हे प्रसिद्धी पासून अलिप्त राहून व्रतस्थपणे लेखन करीत आहेत. चौदार तळे एक मुक्तचिंतन, महाराष्ट्रातील लढे आणि लढवय्ये, आचार्य अत्रे विनोद आणि तत्त्वज्ञान यासारख्या अभ्यासपूर्ण पुस्तकांच्या लेखनानंतर त्यांची 'राम रंगी रंगले आणि सुंदर ते ध्यान' ही दोन पुस्तके अनुबंध प्रकाशनाने नुकतीच प्रकाशित केलेली आहेत. संतश्रेष्ठ तुकाराम महाराज आणि समर्थ रामदास यांच्या जीवनकार्यावर डॉ. माधव पोतदार यांनी या पुस्तकाच्या माध्यमातून प्रकाश टाकला आहे. या दोन्ही संतांनी समाजमानस समृद्ध बनविण्याच्या कामी महत्त्वाची भूमिका बजावली. 'व्यक्तिमत्त्व' नावाचे मूल्य श्रीमंत होण्यासाठी जीवनगीता सांगितली. माणसातला देव जागा करण्यावर दोघांनीही या ग्रंथात समर्पक असे भाष्य केलेले आहे. समर्थ रामदास आणि संतश्रेष्ठ तुकाराम महाराज यांच्या चारशेव्या जयंती वर्षाच्या निमित्ताने त्यांनी सिद्ध केलेले हे दोन्ही ग्रंथ वाचकांना आणि अभ्यासकांना निश्चितच भावतील.

(रामरंग रंगले, सुंदर ते ध्यान - लेखक डॉ. माधव पोतदार, अनुबंध प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३०२ प्रत्येकी, किंमत २५०/- रु.)

**कविता शिकवलेल्या - कविता आवडलेल्या :**




प्रा. एम्.पी. पाटील यांचे कविता शिकवलेल्या कविता आवडलेल्या हे अतिशय सुंदर पुस्तक ठाण्याच्या अनघा प्रकाशनाने प्रकाशित केलेले आहे. अध्यापनाचा एक उत्तम नमुना म्हणून या पुस्तकातील काही टिपणे शिक्षक, प्राध्यापक यांना उपयुक्त ठरतील अशीच आहेत. आवडलेल्या कवितांचे प्रा. पाटलांनी केलेले रसग्रहण काव्यरसिकांना वेगळी दृष्टी देणारे आहे. केशवसुत, बालकवी, भा. रा. तांबे, कुसुमाग्रज, मर्ढेकर, विंदा, नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, मंगेश पाडगावकर, वसंत बापट, आरती प्रभू, शंकर वैद्य, वसंत आबाजी डहाके, दि. पु. चित्रे, अरुण कोलटकर, ग्रेस, इंदिरा संत, पद्मा, ना. धों. महानोर, पुरुषोत्तम पाटील, सतीश काळसेकर, परेन जांभळे, सिसिलिया कार्व्हालो, फ. मुं. शिंदे, रजनी परुळेकर, नीरजा, अरुणा ढेरे, प्रज्ञा पवार, मल्लीका अमरशेख, महेश केळुसकर, अरुण म्हात्रे, अशोक नायगांवकर, नीलिमा पालवणकर, अशा मराठी काव्यपरंपरेला समृद्ध करणाऱ्या कवींच्या कविता आणि त्यातला लेखकाला भावलेला आशय या पुस्तकात वाचायला मिळतो. निखळ काव्यानंद देणारे हे पुस्तक वाचकांना आवडलेच.

(कविता शिकवलेल्या - कविता आवडलेल्या : प्रा. एम्. पी. पाटील, अनघा प्रकाशन, ठाणे, पृष्ठे डेमी ३१४, मूल्य रु. ३१०/-)

**विजांची साखळी आणि दिव्याची अवस :**

'विजांची साखळी आणि दिव्याची अवस' हे ज्येष्ठ साहित्यिक म. गो. पाठक यांचे दोन कथासंग्रह. प्राचार्य राम शेवाळकर यांनी हे संपादित केले आहेत. म. गो. पाठक यांच्या एकूण एकवीस कथा या दोन कथासंग्रहात वाचायला मिळतात. ''म. गो. पाठकांच्या कथासृष्टीत धो धो कोसळणारा पाऊस आहे. आग ओकणारा रखरखी उन्हाळा आहे.




जिवाची तगमग करणारा आकाशात धुळीचा लोट उठविणारा गरम वारा आहे. ग्रामीण भागातील बेमुक्तखोर टगेगिरी आहे. ग्रामकारणातील बेरकीपणा आहे. अवर्षणाच्या छायेतील दुष्काळाचे दैन्य आहे. हे जग बहुधा कोणत्याही प्रदेशात आढळणारे असले तरी या जगावर खास म. गो. पाठकांचीच नाममुद्रा आहे.'' अशा शब्दात शेवाळकरांनी पाठकांच्या कथांचा गौरव केला आहे. खास माणदेशी वासांच्या या कथा वाचकांना वेगळेपणाचा अनुभव देणाऱ्या आहेत.

(विजांची साखळी, दिव्याची अवस : संपादक प्रा. राम शेवाळकर, अनुबंध प्रकाशन, पुणे ४३, पृष्ठे अनुक्रमे डेमी १६०, मूल्य रु. १७२)

**लोकसंस्कृतीचा गाभारा :**



साताऱ्याचे डॉ. राजेंद्र माने हे कथाकार, कादंबरीकार म्हणून सर्वांना ज्ञात आहेत. त्यांचे 'लोकसंस्कृतीचा गाभारा' हे पुस्तक पुण्याच्या अक्षरयात्रा प्रकाशनाने प्रकाशित केलेले आहे. जात्यावरची ओवी, लावणी, यल्लमाचा जग, जोगती, जोगतीणी, दान पावलं, लोकसंस्कृतीतलं सासर-माहेर, लोककथा गीतं, भारूड, येळकोट, दार उघड बया, वारियाने कुंडल हाले, आई भवानी गोंधळा ये, ओळख माझं हुमाण अर्थात कोडं, हादगा, लोकसंस्कृतीतली दिवाळी अशा प्रकरणातून लोकसंस्कृती संदर्भातले अभ्यासपूर्ण लेखन डॉ. मानेंनी केलेले आहे. ललितरम्यशैलीतील हे लेखन वाचकांना खिळवून ठेवणारे आहे. ''लोकसंस्कृती विषयीची उदासीनता, आपल्या संस्कृती विषयी असणारी तुटलेपणाची भावना, लोकमानस आणि त्यांची जीवनशैली या विषयी असणारे अज्ञान दूर करण्याचे कार्य अशा ग्रंथांमुळेच होऊ शकते. लोकसंस्कृतीचे सम्यक् दर्शन घडविणारे हे पुस्तक म्हणून वैशिष्ट्यपूर्ण आहे.'' अशा शब्दात लोकसाहित्याचे आणि लोकसंस्कृतीचे ज्येष्ठ अभ्यासक डॉ. द. ता. भोसले यांनी डॉ. राजेंद्र मानेंच्या लेखनाचे कौतुक केले आहे. सांस्कृतिक संदर्भ हरवत चालल्यामुळे पोरक्या होत जाणाऱ्या आजच्या तरुणपिढीला लोकसंस्कृतीचे दर्शन घडावे यासाठी साध्या, सोप्या आणि नेमक्या शब्दात केलेला हा लेखनप्रपंच वाखाणण्यासारखा आहे.

(लोकसंस्कृतीचा गाभारा : डॉ. राजेंद्र माने, पृष्ठे १६८, मपूल्य रु. १३०/- अक्षरयात्रा प्रकाशन, पुणे)

**हिरव्या बोलीचा बहर :**




सुनील शिनखेडे यांच्या 'हिरव्या बोलीचा बहर' या पुस्तकात कविवर्य ना. धों. महानोर यांच्या समग्र कवितेचा आस्वाद आहे. मातीचे गाणे, ऐश्वर्याचा राजा, अजिंठा : आधुनिक कथाकाव्य, तिची कहाणी, पानझडीतला लावण्य बहर, महानोरांची प्रतिमासृष्टी, निसर्ग कवी महानोर असे आठ अप्रतिम आस्वादक लेख या पुस्तकात आहेत. अजिंठ्याच्या कुशीत असणाऱ्या पळसखेड सारख्या खेड्यात महानोरांची कविता आणि त्यांचे बहुपेडी व्यक्तिमत्त्व या पुस्तकातून उलगडत जाते. सोलापूरच्या आकाशवाणी केंद्रात कार्यरत असणारे सुनील शिनखेडे हे स्वतः उत्तम कवी आहेत. आस्वादक लेखन हे अनेकदा रुक्ष आणि गंभीर असते. पण शिनखेडेंनी वाचकांचे बोट धरून महानोरांच्या फुललेल्या काव्यशिवारातून एक सुंदर सफर या पुस्तकाच्या माध्यमातून घडविली आहे. त्यांना ना. धों. महानोरांचा जवळून सहवास लाभला. या सहवासातून त्यांना महानोरांची काव्यनिर्मिती जाणून घेता आली. त्या जवळकीचे प्रतिबिंबही या लेखनात पडले आहे. महानोरांच्या कवितेवर उदंड प्रेम करणाऱ्या त्यांच्या चाहत्यांना आणि अभ्यासकांना आवडेल आणि उपयुक्त ठरेल असेच हे पुस्तक आहे. (हिरव्या बोलीचा बहर - सुनील शिनखेडे, सुविद्या प्रकाशन, पृष्ठे ६६, किंमत ७० रु.)



अनुक्रमणिका

**आदिवासी साहित्यविचार :**




आदिवासी साहित्याविषयी समग्र विचार करण्यास प्रवृत्त करणारा डॉ. माहेश्वरी गावित यांनी लिहिलेला हा ग्रंथ आहे. आदिवासी जमातींविषयी जनतेच्या मनात अनामिक कुतुहल असते. मात्र या साहित्यप्रवाहाचा अभ्यास करताना केवळ पारंपरिक पद्धतीने आस्वादात्मक विचार करणे पुरेसे ठरत नाही. तर त्यातील श्रेष्ठ आस्वादमूल्यांसह, कलात्मक जाणिवेसह सामाजिक मूल्यांची जाणीव आणि मानवी मूल्यांचा मूलभूत शोध घेणे क्रमप्राप्त ठरते. याचे नेमके भान ठेवून लेखिकेने आपले संशोधनात्मक लेखन केले आहे. आदिवासी साहित्यविचाराबरोबरच या साहित्याची संकल्पना, निर्मितीप्रक्रिया, साहित्याची भाषा, त्यातील सामाजिकता, आस्वादप्रक्रिया, अभिरुचिविचार, आणि नवीन वाङ्मय प्रवाहातील आदिवासी साहित्याचे स्थान अशा अनेक विषयांचा सांगोपांग विचार या ग्रंथामध्ये लेखिकेने केला आहे. आदिवासी साहित्याच्या संशोधनाच्या दृष्टीने, समीक्षा, शास्त्रीय मंडन तसेच विचारमंथनाच्या दृष्टीने या ग्रंथाचे मूल्य मोठे आहे.

(आदिवासी साहित्यविचार : डॉ. माहेश्वरी गावित : वाङ्मयसेवा प्रकाशन, नासिक रोड : पृष्ठे १७६ : मूल्य रुपये १६०)

**कवितेतील अमृतघन :**



कवी म्हणून स्वतःचा स्वतंत्र ठसा उमटविलेल्या दत्ता हलसगीकर यांनी केलेला वेगळा प्रयोग म्हणजे हे पुस्तक आहे. वेगवेगळ्या कवींची मनाला भावलेली एकेक कविता घेऊन त्यावर त्यांनी मुक्तपणे रसग्रहणात्मक भाष्य केलेलं आहे. त्यामध्ये कविवर्य कुसुमाग्रसांपासून बा. भ. बोरकर, मंगेश पाडगावकर या दिग्गजांप्रमाणेच अरुणा ढेरे, पुरुषोत्तम नगरकर, जीवन आनंदगावकर, हिमांशु कुलकर्णी, अंजूम मोमीन, आनंद वर्टी अशा ४१ कवींच्या कवितांचा समावेश आहे. या कविता अगदी छोट्या आहेत. पण अल्पाक्षरातली आशयघनता दाखविणं अन् त्याचबरोबर शैली, नाद-भावातील सौंदर्य, शब्दांपलीकडचं जाणवणारं सत्त्व रसिकांपर्यंत पोहोचवणं, हाच कवींचा हेतू आहे. हे पुस्तक वाचताना हा हेतू साध्य होतोच; पण पुनःप्रत्ययाचा आनंदही मिळतो. शिवाय चैतन्याच्या नवा जाणिवा वाचकाला, त्याच्या सर्जनशीलतेलाही आवाहन करू लागतात.

(कवितेतील अमृतघन : दत्ता हलसगीकर : कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद : पृष्ठे : १२८ : मूल्य : १३० रुपये)

**चार भिंती, एक छप्पर :**



'घर थकले संन्यासी...', 'आत्मबोली', आणि 'स्पर्श सुवर्णाचा' या संग्रहांनंतरचा शीला निपुणगे यांचा हा चौथा ललितलेख संग्रह आहे. यामध्ये चार आत्मपर ललितलेख समाविष्ट करण्यात आलेले आहेत. अत्यंत लहान वयात अंगावर पडलेली संसाराची जबाबदारी, मनात असलेली हळवी स्वप्नं आणि त्याचवेळी समोरं येणारं कठोर वास्तव या सगळ्यामध्ये त्यांच्या स्त्रीमनाची होणारी घुसमट अस्वस्थ करणारी आहे. अनेक प्रसंगांमधलं त्यांचं काहीही व्यक्त न होता सोसत जाणं आणि त्याविषयी कोणतीही कटुता वर्तनात डोकावू न देणं वाचकाला स्तिमित केल्याशिवाय राहात नाही. आयुष्यातील 'प्रेयस' आणि 'श्रेयस' यांचा त्यांनी घातलेला अनोखा मेळ त्यांच्या सुजाण आणि प्रगल्भ व्यक्तिमत्त्वाचे हृदय दर्शन घडवित जाते. रसिकता, संवेदनशीलतेला धैर्याची नि कष्टांची जोड देऊन त्या घरांचं घरपण जपताना दिसतात. त्याचवेळी माणसाचं 'माणूसपण' शोधण्याचीही अखंड धडपड करतात. या सगळ्याचं मनोरम प्रतिबिंब त्यांच्या लेखनात पडलेलं दिसतं. पण

याखेरीज त्यांचं वेगळेपण जाणवतं ते आणखी एका गोष्टीसाठी. परिस्थितीचे फटकारे सोसताना एखादी स्त्री उन्मळून पडली असती किंवा निराशेनं वेढली गेली असती. 'टोचती काटे तरीही, सारे मुक्याने सोसणे' या न्यायानं सारं भोगत असतानाही त्यांनी आत्मभानाची ज्योत मनात जागती ठेवली. त्यामुळेच काळाच्या पुढच्या टप्प्यावर आल्यानंतर त्यांना व्यक्त व्हावंसं वाटतं. हे व्यक्त होणंही अत्यंत संयत आहे. त्यात मनातला सल आहे. पण कटुतेचे कढ नाहीत. परिस्थितीवर स्वार होण्याची जिद्द आहे पण उद्दामपणा नाही. जे वाट्याला आलं त्याचा जगावर राग काढण्याचा अप्पलपोटेपणा नाही. स्वतःशी अत्यंत प्रामाणिक राहात, स्वतःचा शोध घेत केलेलं हे निखळ जीवनचिंतन आहे.

(चार भिंती, एक छप्पर : शीला निपुणगे : शब्दरत्न प्रकाशन, पुणे. पृष्ठे : १२०, मूल्य : १२० रुपये)



## देणगीदार – १ डिसेंबर २००८ ते ३१ मे २००९

| क्र. | दिनांक | नाव | रक्कम | |
|---|---|---|---|---|
| १) | १६-१२-२००८ | श्री. श्रीधर विश्वनाथ सहस्रबुद्धे | २,०००/- | न्या.म.गो. रानडे व्याख्यानमालेसाठी देणगी |
| २) | ७-१-२००९ | श्री. सु. वा. जोशी | ५००/- | कॉफी क्लबसाठी देणगी |
| ३) | १२-१-२००९ | मीनाक्षी केळकर | २००/- | बालविभाग दिवाळी अंक स्पर्धेसाठी |
| ४) | १२-१-२००९ | म. ना. गोगटे | १,०००/- | कॉफी क्लबसाठी देणगी |
| ५) | १७-१-२००९ | संत ज्ञानेश्वर शिक्षणशास्त्र महाविद्यालय | २००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ६) | १९-१-२००९ | महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ | ५,००,०००/- | अनुदान |
| ७) | १९-१-२००९ | संस्कृती प्रकाशन | ३,०००/- | युवा मुक्त मंचासाठी देणगी |
| ८) | २३-१-२००९ | मीनाक्षी केळकर | ३००/- | दिवाळी अंक बालविभाग दिवाळी अंक स्पर्धेसाठी |
| ९) | ३-२-२००९ | श्रीपाद बापूराव जोशी | १०१/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| १०) | २५-२-२००९ | चंद्रशेखर शंकरराव बर्वे | १,०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ११) | २७-२-२००९ | डॉ. कल्याणी दिवेकर | २००/- | युवा मुक्त मंचासाठी देणगी |
| १२) | ४-३-२००९ | सहाय्यक ग्रंथालय संचालक | २,५००/- | ग्रंथालयासाठी अनुदान |
| १३) | ५-३-२००९ | अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ | १०,५८८/- | शुद्धलेखन चर्चासत्रासाठी देणगी जमा |
| १४) | ५-३-२००९ | डॉ. मु. श्री. कानडे | १,०००/- | मराठी वाङ्मय इतिहास खंडाच्या पुनर्मुद्रणासाठी (खंड २) |
| १५) | ९-३-२००९ | जनसेवा दुग्ध मंदिर | ५,०००/- | मराठी वाङ्मय इतिहास खंडाच्या पुनर्मुद्रणासाठी (खंड २) |
| १६) | २९-३-२००९ | डॉ. सु. प्र. कुलकर्णी | ३१५/- | योगक्षेमार्थ देणगी |
| १७) | ३०-३-२००९ | बळवंत शंकर जोशी | २०,०००/- | कै. शं. ना. जोशी पुरस्कारासाठी देणगी |
| १८) | ९-४-२००९ | श्रीमती प्रतिभाताई आडकर | २,०००/- | मराठी वाङ्मय इतिहास खंडाच्या पुनर्मुद्रणासाठी (खंड २) |
| १९) | १५-५-२००९ | डॉ. व्ही. एस्. मुगडे | १,०००/- | ग्रंथालयाच्या पारितोषिकासाठी देणगी |
| २०) | १५-५-२००९ | सुवर्णा चंद्रकांत दीक्षित | १,०००/- | ग्रंथालयाच्या पारितोषिकासाठी देणगी |
| २१) | १५-५-२००९ | प्रकाश मिसाळ | २,५००/- | ग्रंथालयाच्या पारितोषिकासाठी देणगी |
| २२) | १५-५-२००९ | सौ. वसुधा जोशी | १,०००/- | ग्रंथालयाच्या पारितोषिकासाठी देणगी |
| २३) | २१-५-२००९ | मा. रघुनाथ भास्कर चितळे | ३,००,०००/- | वाङ्मयइतिहास खंड ७वा प्रकाशनासाठी देणगी |
| २४) | २३-५-२००९ | वंदना शेलार | १,०००/- | ग्रंथालयाच्या पारितोषिकासाठी देणगी |





अनुक्रमणिका

## कार्यवृत्त (१ मार्च २००९ ते ३१ मे २००९)

डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह

**दि. १७ मार्च २००९ :**

**कॉफीक्लब :**

सॅनहोजे येथे फेब्रुवारी २००९ मध्ये झालेल्या पहिल्या विश्व साहित्य संमेलनातले अनुभव कथन : सहभाग डॉ. वि. भा. देशपांडे, प्रा. मिलिंद जोशी, रामनाथ चव्हाण, डॉ. सतीश देसाई, सुनील महाजन, गाडगीळ, राजन लाठे.

यावेळी राजाराणी ट्रॅव्हल्सचे श्री. नितीन शास्त्री हे खास उपस्थित होते.

तसेच उपस्थित श्रोत्यांपैकी काहींनी आपले अनुभव सांगितले व काहींनी प्रश्न विचारले.

**१० एप्रिल २००९ : डॉ. श्री. व्यं. केतकर स्मृतिदिनः**

सकाळी ८.३० वाजता पुण्यातील कमला नेहरू उद्यानातील डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या समाधीस्थलापाशी परिषदेचे कार्यकर्ते, कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे, प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य, कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, नंदा सुर्वे, स्वाती महाळंक, दीपक करंदीकर व इतर नागरीक यांच्या उपस्थितीत केतकरांच्या समाधीला कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे यांच्या हस्ते पुष्पहार अर्पण करण्यात आला. नंतर उपस्थितांनी समाधीवर फुले वाहिली व केतकरांच्या स्मृतीस अभिवादन केले. दीपक करंदीकर यांनी केतकरांविषयी चार ओळींचे काव्य त्यांना आदरांजली म्हणून सादर केले. परिषदेतर्फे उपस्थितांना पेढे वाटण्यात आले.

यानंतर सायंकाळी परिषदेच्या सभागृहात 'डॉ. श्री. व्यं. केतकर आणि कोशवाङ्मयाचे महत्त्व' या विषयावर म. सा. प. च्या सोलापूर शाखेचे कार्याध्यक्ष प्रा. सुहास पुजारी यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक डॉ. वि. भा. देशपांडे, वक्त्यांचा परिचय व स्वागत प्रा. मिलिंद जोशी यांनी केले व सूत्रसंचालन व आभारप्रदर्शन दीपक करंदीकर यांनी केले.

**१३ एप्रिल २००९ : शं. ना. जोशी पुरस्कार वितरण समारंभ :**

प्रास्ताविक डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. अध्यक्षस्थानी असलेले डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांचे गुच्छ देऊन स्वागत करण्यात आले. तसेच परीक्षकांपैकी डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांचाही गुच्छ देऊन सत्कार करण्यात आला. त्यानंतर नंदा सुर्वे यांनी पुरस्कारविजेते डॉ. पाटील यांचा परिचय करून दिला. डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी परीक्षणामागचा दृष्टिकोन विशद केला. नंतर अध्यक्षांचे हस्ते पुरस्कार वितरण झाले. पुस्तकाचे प्रकाशक अरुण जाखडे यांचा अध्यक्षांचे हस्ते सत्कार करण्यात आला. कै. शं. ना. जोशी यांचे सुपुत्र श्री. ब. शं. जोशी यांनी मनोगत व्यक्त केले. सचिन पोळगे यांनी कै. शं. ना. जोशी यांच्याविषयीच्या आठवणींचे कथन केले. अध्यक्ष डॉ. शेजवलकर यांनी समारोप केला. सूत्रसंचालन स्वाती महाळंक व आभारप्रदर्शन दीपक करंदीकर यांनी केले.

**१८ एप्रिल २००९ :**

अक्षरधारा व मसाप यांच्या संयुक्त विद्यमाने मसापच्या तळघरात 'पुस्तकसंपर्क केंद्र' सुरू करण्यात आले. प्रास्ताविक लक्ष्मण राठीवडेकर यांनी केले. सूत्रसंचालन सिद्धार्थ बेंद्रे यांनी केले. प्रमुख पाहुणे म्हणून नितीन अंबिके उपस्थित होते. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी परिषदेची भूमिका सांगितली व उपक्रमांची माहिती दिली. मान्यवरांना ग्रंथभेट देऊन स्वागत करण्यात आले. बालवाचकांच्या हस्ते दीपप्रज्वलन करून उद्घाटन झाले. उद्घाटक डॉ.अनिल अवचट यांनी मनोगत व्यक्त केले. अध्यक्ष दत्ता टोळ यांनी आपले विचार प्रकट केले. शिवांगी राठीवडेकर हिने प्रतिज्ञेचे वाचन केले. डॉ. अवचट यांनी ओरोगामी कलेची प्रात्यक्षिके मुलामुलींसाठी सादर केली.

**२८ एप्रिल २००९ : कै. कमांडर मधुकर केशव लेले स्मृतिदिन**

सरोजा भाटे यांचे 'महाभारताचा विश्वसंचार' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले. डॉ. वि.

वि. घाणेकर यांनी लेले यांची माहिती दिली. डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक व स्वागत केले. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**११ मे २००९ : श्रद्धांजली सभा :**

थोर साहित्यिक, वक्ते, प्रा. राम शेवाळकर यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी पर्वती संस्थान पुणे व म.सा.प. पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने श्रद्धांजली सभा पुण्यातील सारसबागेत आयोजित करण्यात आली होती. प्रास्ताविक बापूसाहेब तथा मनोहर जोशी यांनी केले. दीपक करंदीकर, प्र. द. पुराणिक, दयानंद मटकर, डॉ. न. म. जोशी, मुकुंद अनगळ, सु. वा. जोशी, श्याम भुर्के, प्रा. मिलिंद जोशी, उद्धव कानडे, रा. बा. चव्हाण, अविनाश पितळे यांनी श्रद्धांजलीपर भाषणे केली. शेवटी म.सा. परिषदेच्या प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी शोक प्रस्तावाचे वाचन केले. शेवटी उपस्थितांनी दोन मिनिटे स्तब्धता पाळून श्रद्धांजली वाहण्यात आली.

**१४ मे २००९ : युवामुक्त मंच :**

'आमचं वाचन' या विषयावर परिषदेच्या 'युवामुक्त मंच' तर्फे गप्पांचा कार्यक्रम झाला. मुक्त पत्रकार नीला शर्मा यांनी काही प्रश्न विचारून निमंत्रित मान्यवरांना बोलते केले. या गप्पांमध्ये 'केसरी टूर्स अॅन्ड ट्रॅव्हल्स'च्या संचालिका झेलम चौवळ, कथक नृत्यांगना शांभवी वझे, अभिनेत्री मेघना वैद्य यांनी सहभाग घेतला. प्रास्ताविक व सूत्रसंचालन महेंद्र मुंजाळ यांनी केले. प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी आभार मानले.

**१७ मे २००९ :**

रोजी पुण्यातील मृत्युंजयेश्वर मंदिर परिसरात कै. प्रा. राम शेवाळकर यांच्या ज्ञानेश्वरीवरील व्याख्यानाची चित्रफित दाखविण्यात आली.

**२६, २७ व २८ मे २००९ : वार्षिक पारितोषिक वितरण समारंभ आणि १०३वा वर्धापन दिन सोहळा:**
**मंगळवार, दि. २६ मे :**

स्वागत-प्रास्ताविक ह. ल. निपुणगे यांनी केले. अध्यक्ष डॉ. मुकुंद अभ्यंकरांचा परिचय स्वाती महाळंक यांनी करून दिला. प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रमुख पाहुणे डॉ. अच्युत गोडबोले यांचा परिचय करून दिला. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या हस्ते मान्यवरांचा सत्कार करण्यात आला. परीक्षा विभागाची पारितोषिके जाहीर करण्यात आली. त्याची माहिती परीक्षा विभाग प्रमुख डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांनी दिली. यानंतर परिषदेच्या 'वेबसाईट'चे उद्घाटन डॉ. अच्युत गोडबोले यांच्या हस्ते झाले. डॉ. माधवी वैद्य यांनी 'वेबसाईट' संबंधीची प्राथमिक माहिती दिली. श्री. शिरगांवकर यांनी वेबसाईटची संपूर्ण माहिती दिली. यानंतर ग्रंथपारितोषिक वितरणाचा सोहळा पार पडला. दीपक करंदीकर यांनी परीक्षकांचा ऋणनिर्देश केला. पुरस्कार विजेत्यांपैकी डॉ. सुधा पटवर्धन यांनी आपले मनोगत व्यक्त केले. यानंतर प्रमुख पाहुणे डॉ. गोडबोले यांचे 'चाकोरी बाहेरचे लेखन' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्ष डॉ. मुकुंद अभ्यंकर यांनी अध्यक्षीय भाषण केले. अॅड. प्रमोद आडकर यांनी आभार मानले. परिषदेच्या १०३ व्या वर्धापन दिन सोहळ्याचा मुख्य समारंभ यानंतर झाला.

सूत्रसंचालन नंदा सुर्वे यांनी केले. अंजली महागावकर यांनी शारदा स्तवन व शेवटी पसायदान म्हटले.

**बुधवार दि. २७ मे २००९ :**

स्वागत व प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी केले. सूत्रसंचालन स्वाती महाळंक यांनी केले. अध्यक्ष कविवर्य ना. धों. महानोर यांचा परिचय डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांनी करून दिला. महानोरांचा सत्कार कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या हस्ते करण्यात आला. प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी परिषदेचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांचे स्वागत केले. मुकुंद किर्लोस्करांनी खास पाठविलेले गुच्छ दोन्ही पुरस्कारार्थींना प्रदान करण्यात आले. प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रा. के. रं. शिरवाडकर यांचा परिचय करून दिला. यानंतर के. रं. शिरवाडकर यांना महानोरांच्या हस्ते मसाप गौरव पुरस्कार देण्यात आला. डॉ. माधवी वैद्य यांनी श्रीकृष्ण बेडेकर यांचा परिचय करून दिला. यानंतर महानोरांच्या हस्ते श्रीकृष्ण बेडेकर यांना परिषदेचा डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या नांवे दिला जाणारा 'कार्यकर्ता पुरस्कार' प्रदान करण्यात आला. प्रा. के. रं. शिरवाडकर व श्रीकृष्ण बेडेकर यांनी मनोगते व्यक्त केली. कविश्रेष्ठ ना. धों. महानोर यांनी अध्यक्षीय भाषण केले. डॉ. किसन पाटील यांनी आभार मानले.

**गुरुवार, दि. २८ मे २००९ : वाङ्मयेतिहास खंड**

**७वा भाग १ ला प्रकाशन समारंभ :**

मा. वसुंधरा पेंडसे-नाईक, प्रा. रा. ग. जाधव यांचे स्वागत डॉ. वि. भा. देशपांडे यांनी पुष्पगुच्छ देऊन केले. धनंजय दातार यांचा सत्कार प्रा. द. मा. मिरासदार यांनी केला (त्यांनी वेबसाईटचे काम/मार्गदर्शन केले.) यानंतर डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. प्रा. रा. ग. जाधव यांनी संपादकांचे मनोगत व्यक्त केले. खंडाच्या लेखकांचे व संबंधितांचे सत्कार प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते करण्यात आले. मा. वसुंधरा पेंडसे नाईक व प्रा. रा. ग. जाधव यांचा परिचय कल्याणी दिवेकर यांनी करून दिला. 'वाङ्मयैतिहास खंड ७वा भाग पहिला' या ग्रंथाचे प्रकाशन वसुंधरा पेंडसे-नाईक यांच्या हस्ते झाले. अध्यक्षीय भाषण वसुंधरा पेंडसे नाईक यांनी केले. डॉ. सतीश देसाई यांनी आभार प्रदर्शन केले.

यानंतर कविश्रेष्ठ ना. घ. देशपांडे यांच्या जन्म शताब्दीनिमित्त 'रानात गेलीबाई शीळ' हा संगीतमय कार्यक्रम सादर करण्यात आला. त्याचे संचालन कविश्रेष्ठ ना. धों. महानोर यांनी केले. प्रसिद्ध संगीतकार व गायक राहुल घोरपडे व त्यांचे सहकारी यांनी हा सुमारे एक तासाचा कार्यक्रम सादर केला. प्रास्ताविक व पाहुण्यांची ओळख डॉ. सतीश देसाई यांनी केली. शेवटी आभार प्रदर्शन सौ. प्रतिभा लिमये यांनी केले. राहुल घोरपडे, प्रमोद रानडे, राहुल घोंगडे या गायक कलाकारांनी या कार्यक्रमात भाग घेतला.

सूत्र संचालन प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी केले.

शब्दांकन : **दीपक करंदीकर**
स्वीकृत सदस्य, मसाप, पुणे

❖❖❖

## सोलापूर शाखा

**२२ फेब्रुवारी २००९ : महिला दिन :**

'आई कोमल तरीही खंबीर' या विषयावर महिलांसाठी खास वक्तृत्वस्पर्धेचे आयोजन कविवर्य दत्ता हलसगीकर यांच्या अध्यक्षतेखाली करण्यात आले होते. स्पर्धेत २० महिलांनी भाग घेतला.

प्रथम क्रमांक : सुरेखा देशमाने, पारितोषिक रु. २०१/- रोख.

द्वितीय क्रमांक : शोभा चव्हाण, पारितोषिक रु. १५१/- रोख

तृतीय क्रमांक : संजीवनी मुळे, पारितोषिक रु. १०१/- रोख

उत्तेजनार्थ : अश्विनी मोटे, पारितोषिक रु. ५१/- रोख

अशी पारितोषिके देण्यात आली. परीक्षक म्हणून संजीवनी काळे यांनी काम पाहिले. नागेश सुरवसे यांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली. प्रास्ताविक प्रा. प्रेमचंद मेने यांनी केले. परिचय निर्मला मठपती यांनी करून दिला. वंदना कुलकर्णी यांनी आभार मानले व शोभना सागर यांनी सूत्रसंचालन केले.

कार्यवाह

❖❖❖

## धुळे जिल्हा शाखा

**दि. ३० डिसेंबर २००८ : स्व. प्रा. सी. आयमोरे स्मृतिदिन :**

प्रा. ऋषिकेश कांबळे (औरंगावाद) यांचे 'सामाजिक चळवळी : आज आणि उद्या' या विषयावर व्याख्यान झाले. दै. गावकरीचे जिल्हा प्रतिनिधी श्री. अनिल चव्हाण अध्यक्ष होते.

**२७ जानेवारी २००९ : स्व. डॉ. शांतारामभाऊ देशपांडे स्मृतिदिन :**

डॉ. अरविंद महाजनी यांच्या अध्यक्षतेखाली यादव खैरनार, प्रा. सौ. रंजना खैरनार व प्रा. दिलीप चव्हाण यांनी नवोदितांच्या काही निवडक कविता सादर केल्या.

**१ एप्रिल २००९ : स्व. विद्याधर वैद्य स्मृतिदिन :**

वैद्य लिखित 'खिडकीतल्या कविता' या काव्यसंग्रहावर प्रा. डॉ. कृष्णा पोतदार यांचे व्याख्यान झाले. गरूड वाचनालयाचे उपाध्यक्ष डॉ. सुनिल कोरान्ने अध्यक्षस्थानी होते. प्रा. पुरुषोत्तम पाटील यांचा सत्कार करण्यात आला. प्रास्ताविक प्रा. सुलभा भानगावकर यांनी केले. परिचय मोहन मोरे तर आभार विश्वनाथ मोराणकर यांनी केले. सूत्रसंचालन प्रा. डॉ. शशिकला पवार यांनी केले.

कार्यवाह



अनुक्रमणिका

